# महाराष्ट्राचा पुण्यग्राम.

लेखक


विष्णु विनायक करमरकर

बी. ए. एल. एल. बी वकील



हें पुस्तक

पुणें पेठ सदाशिव घर नंबर ५३०

येथें

नारो आपाजी गोडबोले

यांचे

“ वृत्तप्रसारक ” छापखान्यांत

महादेव भास्कर गोडबोले

यांनीं छापून प्रसिद्ध केलें

सन १९२५

आवृत्ति १ ली.

किंमत बारा आणे.






# अनुक्रमणिका.

# महाराष्ट्राचा पुण्यग्राम.

## हितगुज.

' महाराष्ट्राचे पंचप्राण ' हें पुस्तक लिहित असतां एक गोष्ट सतत मनांत येई ती ही कीं न्यायमूर्ति रानडे, विष्णुशास्त्री चिपळूणकर, प्रिन्सिपाल आगरकर, लोकमान्य टिळक व नामदार गोखले या महाराष्ट्राच्या पंचप्राणांना पुणें शहर म्हणजे आपला जीव कीं प्राण वाटत असे. या पंच विभूतींचें पुण्यावर अतोनात प्रेम असे. मुंबई हायकोर्टांत अतिशय मानाची व मोठ्या हुद्याची नोकरी मिळून मुंबईस जावें लागल्यामुळें जेव्हां पुण्याचा वियोग होण्याचा प्रसंग न्यायमूर्तीवर आला तेव्हां त्यांच्या डोळ्यांतून सारख्या अश्रुधारा वाहूं लागल्या. मुंबईस रहावयास गेल्यावरही त्यांचें मन नेहमीं पुण्याकडे धांव घेत असे. कोणतीही अलौकिक गोष्ट करील तर माझें पुणेंच करील असें माधवरावांना नेहमीं वाटे. जरा सुट्टी झाली कीं लगेच न्यायमूर्ति पुण्याची वाट धरीत. निबंधमालाकार विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचेंही पुण्यावर अतिशय प्रेम होतें. त्यांनीं आपलें सर्व आयुष्य पुण्यांत घालविलें. पुण्याहून जेव्हां त्यांची रत्नागिरीस बदली झाली तेव्हां त्यांना पराकाष्ठेचें दुःख झालें. रत्नागिरीस त्यांनीं कसेंबसें एक वर्ष काढलें. शेवटीं पुण्याचा वियोग असह्य होऊन त्यांनीं चांगल्या पगाराच्या व मानाच्या सरकारी नोकरीचा ताडकन राजीनामा दिला व पुण्याकडे धांव घेतली. पुण्यास आल्यामुळेंच त्यांच्या कर्तबगारीचें चीज झालें व त्यांना अर्वाचीन महाराष्ट्राचे जनक होतां आलें. पुण्यांतील ऐति-

ह्रासिक स्थळांच्या दर्शनानें त्यांचा देशाभिमान जागा झाला व स्वभाषे-वरील प्रेम उचंबळून आलें. असें झाल्यामुळेंच जन्मभर स्वदेशसेवेंत देह झिजविण्याची प्रतिज्ञा त्या थोर पुरुषानें केली. प्रि. गोपाळराव आगरकर मूळचे कांहीं पुण्याचे नव्हते. त्यांचीं प्रथमचीं बरींच वर्षें कऱ्हाड रत्नागिरी व अकोला या शहरीं गेलीं. पण प्रि. आगरकरांची कर्तबगारी, प्रि. आगर-करांची लेखनशैली व प्रि. आगरकरांची समाजसुधारणेविषयींची व शिक्षणविषयक कामगिरी यांचा प्रभाव प्रथम पुण्यासच प्रकट झाला. या पुण्यग्रामानेंच त्यांच्या कर्तबगारीला पुढें आणलें. जरी पुणेकरांनीं त्यांच्या-वर प्रथम बरेच हल्ले केले व त्यांच्या विचारसरणीचा स्वीकार केला नाहीं, तरी पुणेकरांचें आगरकरांवर, व आगरकरांचें पुण्यावर अतोनात प्रेम होतें. हे जन्मभर पुण्यांतच राहिले व पुण्यांतच देशसेवा करीत करीत त्यांनीं आपला देह ठेविला.

लोकमान्य टिळक यांचीही गोष्ट वरील तीन थोर गृहस्थांप्रमाणेंच होती. त्यांच्या रोमरोमांत पुणें भरलें होतें. त्यांनीं अनेकवेळां दूरदूरचा प्रवास केला, पण देहानें कोठेंहि असले तरी त्यांचें मन पुण्यासच होतें. पुण्याचा नांवलौकिक त्यांनीं जगभर पसरविला. पुण्याचें पाणी आपल्या आद्वितीय ग्रंथांनीं, निस्सीम स्वार्थत्यागानें, विलक्षण धडाडीनें व उज्ज्वल देशाभिमानानें त्यांनीं युरोप व अमेरिका या खंडांतील लोकांना दाखविलें. आज सर्व जगतांत जें पुणें इतकें प्रसिद्धीस आलें आहे तें टिळकांमुळेंच. भारतसेवक गोपाळ कृष्ण गोखले विद्यार्थिदशेपासूनच जे एकदां टिळक आगरकरांवरील प्रेमानें कोल्हापुराहून पुण्यास आले ते अखेर पर्यंत पुण्यासच राहिले. तीनवेळां ते विलायतेस गेले. पण विलायतेंत स्वदेशाची कामगिरी बजाबतांच मनोवेगानें त्यांनीं पुण्याकडे धांव घेतली. त्यांचें पुण्यावर इतकें प्रेम होतें कीं शेवटीं जेव्हां ते विलायतेस अतिशय आजारी पडले तेव्हां 'मी पुण्यासच देह ठेवणार' असा कृतसंकल्प करून अंगांत शक्ति नस-तांही त्यांनीं लांबचा प्रवास केला व पुण्यास येऊन देहाचें विसर्जन केलें. ही झाली आपल्या आठवणींतील थोर पुरुषांची गोष्ट. प्राचीन

इतिहासांतील थोर पुरुषांकडे पाहिलें तरी हीच गोष्ट निदर्शनास येते. प्रतापशाली शिवाजी महाराज यांचा जन्म याच पुणें प्रांतीं शिवनेरी किल्ल्यांत झाला. त्यांनीं आपलें बाळपण याच पुणें शहरांत कसबा पेठेंत घालविलें. पुण्यशील माता जिजाबाई यांनीं स्वदेशसेवेचें बाळकडू याच पुणें शहरांत शिवबाला पाजलें, व राजगुरु दादाजी कोंडदेव यांनीं श्रीगणेशाचा धडा याच पुण्यांत शिवबाळाला धूळ पाटीवर काढून दिला. स्वराज्याच्या श्रीगणेशाचाही धडा शिवबाळानें याच पुण्यांत प्रथम गिरविला व स्वराज्याचा झेंडा याच पुण्यांत त्यांनीं प्रथम रोंविला. याच्याही मागच्या कालाकडे नजर फेंकली तरी हीच गोष्ट अधिक स्पष्टपणें तुम्हांस दिसून येईल. श्रीकृष्ण परमात्मा यांनीं अर्जुनाला उपदेशिलेली भगवद्गीता याच पुणें प्रांतीं आपल्या प्रासादिक दिव्य वाणीनें ज्ञानेश्वरांनीं आळंदीस मराठींत सांगितली, व त्यानंतर याच पुणें प्रांतांत वास्तव्य करून परम भगवद्भक्त तुकोबा यांनीं देहूस राहून भक्तिरसाचें अमृत आपणा महाराष्ट्रीयांस प्रथम पाजलें. या पुणें शहरीं स्वतः येऊन कीर्तनें करून विश्ववंद्य तुकोबानीं ही पुण्यनगरी पुण्यमय करून टाकली. बाळाजी विश्वनाथांचे प्रतापशाली चिरंजीव बाजीराव यांनीं व त्यांच्या वंशजांनीं हें पुणेंशहर सर्व हिंदुस्तानची खरोखरची राजधानी बनविलें. सारांश शिवभूपतीपासून आज तागायत स्वराज्याचा पुकारा व प्रारंभ याच पुणें शहरांतून प्रथम झालेला आहे. धार्मिक, राजकीय, सामाजिक औद्योगिक व शैक्षणिक जेवढ्या म्हणून चळवळी झाल्या त्यांचा जन्म याच पुणें शहरांत झाला. जवानमर्द महादजी शिंदे यांनीं पुण्याहून भरारी मारून प्रत्यक्ष दिल्लीच्या बादशहांना आपल्या मुठींत आणून अलोट कीर्ति, संपत्ति, वैभव व सामर्थ्य संपादन केलें, तरी लगेच त्यांनीं पुण्याकडे धांव घेतली. हेतू हा कीं माझ्या पुण्यानें माझ्या पराक्रमाचें कौतुक करून माझी पाठ थोपटावी. अशी पुण्यानें पाटील बुवांची पाठ थोपटली तेव्हां पाटिलबुवा कृतकृत्य झाले. शेवटीं सर्व हिंदुस्तानाला दिपवून टाकणारा हा दैदीप्यमान तारा या पुणें शहरांतच अस्तंगत झाला. हिंदुस्तानभर समशेरीनें नांव गाजवणाऱ्या महा-

दजीप्रमाणेंच आपल्या बुद्धिबळानें जगाला थक्क करणारे फडणिसनाना येथेंच उदयास आले व येथेंच मरण पावले. अगदीं अलीकडील गोष्ट घ्या, सर्व जगांतील मी मी म्हणणाऱ्या गणित्यांना मागें हटवून केंब्रिजला पहिला नंबर पटकावणारे पहिले हिंदी सीनीअर रँग्लर रघुनाथराव परांजपे हे तरी या पुण्यांतच शिकलेले.

असें या पुणे शहराचें माहात्म्य व थोरवी जेवढी सांगावी तेवढी थोडीच. अशा या पुण्यग्रामाचें दर्शन जेव्हां मला प्रथम झालें तेव्हां साहाजिकच त्याचें रंजितांसही रंजवून उत्तेजित करणारें वर्णन वाचावें अशी इच्छा झाली. अतीशय शोध केला, तेव्हां समजलें कीं असल्या या प्रभावशाली पुण्यनगरीचें वर्णन करणारें एकही पुस्तक हल्लीं उपलब्ध नाहीं. हें समजतांच मनाला अतीशय वाईट वाटलें. पण एकदां जागृत झालेली जिज्ञासा थोडीच स्वस्थ बसूं देणार आहे? लगेच धडपड करून निरनिराळ्या इंग्रजी पुस्तकांत व कांहीं मराठी पुस्तकांत जेवढी माहिती मिळाली तेवढी वाचली, व हयात असलेल्या अतिवृद्ध नागरिकांस विचारून ऐकून घेतली व अशा रीतीनें दुधाची तहान ताकावर भागविली.

थोर व अधिकारी माणसांकडून हें पुण्यग्रामवर्णनाचें पवित्र कार्य झालें असतें तर फारच चांगलें झालें असतें. पण तें अद्यापपर्यंत झालें नाहीं, व पुढें केव्हां होईल तेंही सांगतां येत नाहीं, तेव्हां आपणच यथामति या पुण्यग्रामाचें उत्तेजक व देशसेवाप्रवर्तक वर्णन करावें असें मनांत येऊन हें पुस्तक मीं लिहिलें, व तें आज माझ्या सर्व हिंदुस्थानभर किंबहुना सर्व जगभर पसरलेल्या महाराष्ट्र प्रियबंधूंना व प्रियभगिनींना मी प्रेमानें अर्पण करीत आहें.

हें पुस्तक लिहिण्याचे कामीं मला अनेक थोर पुरुषांनीं लिहिलेल्या उत्कृष्ट इंग्रजी व मराठी ग्रंथांचा अतीशय उपयोग झाला आहे, यासाठीं मी त्या सर्व थोर ग्रंथकारांचा फार आभारी आहें. ह्या पुस्तकांत जे जे दोष प्रिय वाचकांना आढळून येतील व ज्या सूचना कराव्याशा वाटतील त्या त्यांनीं कृपा करून मला कळविल्यास फार उपकार होतील, व पुढील आवृत्ति काढतांना त्यांचा उपयोग करून घेतला जाईल.

शेवटीं ह्या पुस्तकाच्या वाचनानें पुण्याची महति व पुण्याई वाचकांचे नजरेस येवो व ती त्यांना स्वकार्यदक्ष, स्वदेशप्रेमी, व स्वार्थ-त्यागी बनवो व त्यांच्या अलौकिक सत्कृत्यांनीं या पुण्यग्रामाचें वैभव व नांव सर्व जगांत चिरकाळ गाजो अशी त्या परम दयाळू जगदीशाची प्रार्थना करून वाचकांची रजा घेतों.

---

# पूर्ववृत्त

पुण्यग्राम अथवा पुणें शहर हें कांहीं अलीकडचें नाहीं. हें शहर केव्हां अस्तित्वांत आलें हें नक्की सांगतां येत नाहीं. तरी पण इसवी सन १५० मधें पुणें शहर सर्वत्र प्रसिद्ध होतें. सुप्रसिद्ध ग्रंथकार टॉलेमी यानें पुनत शहर एक प्रकारच्या उंची दगडाविषयीं प्रसिद्ध आहे असें इ० स० १५० मधें लिहून ठेविलें आहे. त्यानें ज्या मर्यादा व खाणाखुणा दिल्या आहेत त्या हल्लींच्या पुण्यास लागू पडतात, यावरून या पुण्याचाच पुनत या नांवानें त्यानें उल्लेख केला असला पाहिजे हें उघड आहे.

यानंतर पुण्याविषयीं स्पष्ट उल्लेख तळेगांव येथें सांपडलेल्या एका ताम्र-पटांत केलेला आहे. हा ताम्रपट इ० स० ७६८ मधला आहे. त्यावेळीं पुणें प्रांतावर राष्ट्रकूट वंशाचे राजे राज्य करीत असत. या राष्ट्रकूट वंशांत कृष्णराज नांवाचा एक दानशूर राजा होऊन गेला. त्यानेंच वर सांगित-लेला ताम्रपट तयार केला. ता. २३ मार्च इ० स० ७६८ ला एक सूर्य ग्रहण पडलें. त्या दिवशीं पुण्याजवळ असलेलें कोरेगांव ( कुमारीग्राम ) त्या राजानें दान केलें, व ती गोष्ट नमूद करण्यासाठीं वर सांगितलेला ताम्रपट तयार केला. त्या ताम्रपटांत ह्या कोरेगांव ( कुमारीग्राम ) चे दक्षिणेस पूर्वेस खामगांव, व खादिर टेंकडी, पश्चिमेस आळंदी आणि थेऊर आणि उत्तरेस मुळानदी आहे व हें गांव पुनक प्रांतांत आहे असें लिहिलें आहे. यापुढें सन १३४० पर्यंत पुणें शहरचा उल्लेख कोठें केलेला आढ-ळत नाहीं. सन १३४० मधें अल्लाउद्दीन खिलजी यानें दिल्लीहून देवगि-रीवर स्वारी केली. देवगिरीच्या यादवराजांचा पराभव केला व पुणें व कोंडाणा ( सिंहगड ) घेतला. सन १३४० पासून १५९५ पर्यंत हें पुणें शहर मुसलमानी अमलांत होतें.

इ० स० १५९५ मध्यें अहमदनगरचा बादशहा निजामशहा यानें पुणें व आणखी दुसरीं तीन गांवें शिवाजी महाराजाचे आजे मालोजी भोंसले यांना जहागीर म्हणून दिलीं. त्यावेळेपासून सन १८१८ पर्यंत पुणें शहर मराठी अमलाखालीं होतें. मात्र मध्यंतरीं फार थोडे दिवस तें औरंगजेबाचा दक्षिणेंतील सुभेदार शाहिस्तेखान यानें काबीज केलें होतें. इ० स० १८१८ त मराठी राज्य बुडालें व हें पुणें शहर इंग्रजी अमलाखालीं आलें.

पुणें हा पुण्य या शब्दाचा अपभ्रंश आहे. या शहराचें मूळचें नांव पुण्यक. हें नांव या शहराला पडण्याचें कारण हें शहर मुळा व मुठा या नद्यांच्या संगमावर वसलें आहे हें होय. दोन नद्यांच्या संगमावरच्या गांवाला पुण्यभूमि किंवा पुण्यक्षेत्र समजण्याचा आपला हिंदूंचा प्राचीनकाळापासून प्रघात आहे. प्रयाग व माहुली हीं शहरें संगमावर वसलेलीं आहेत. त्यांनाही पवित्र मानतात तें या करितां. शिवाय मुळा व मुठा या नद्यांच्या संगमाजवळ पुण्येश्वराचें देऊळ होतें. या पुण्येश्वरावरूनही या शहराला पुण्यक, पुण्यंत किंवा पुणें हें नांव पडलें असेल. पुणें हें प्राचीन काळीं म्हणजे इ० स० ६१३ चे सुमारास एक अगदी क्षुद्र खेडें होतें. तेथें सुमारें पंधरा भिकार झोपडीं होतीं. त्यांपैकीं दोन ब्राह्मणांचीं व बाकीचीं कोळी वगैरे लोकांचीं होतीं.

अत्यंत प्राचीनकाळचीं कामें म्हटलीं म्हणजे भांबुरडा पेठेंतील शैव गुहा व गणेशखिंडींतील लेणीं हीं होत. गणेशखिंडींतील लेणीं केव्हां तयार करण्यांत आलीं असावीं हें सांगतां येत नाहीं. भांबुरड्याची शैव गुहा इसवीसनाच्या ७ व्या किंवा ८ व्या शतकांतली असावी असा तर्क आहे. पुणे शहराचें रक्षण करण्यासाठीं बहिरोबा, मारुति, नारायणेश्वर पुणेश्वर, आणि म्हसोबा यांचीं निरनिराळ्या दिशांना हद्दीवर देवळें बांधलेलीं होतीं. त्या पैकीं म्हसोबा, मारुती व पुणेश्वर यांचीं देवळें अजून अस्तित्वांत आहेत. पुणेश्वराला मात्र मध्यंतरीं मुसलमानांनीं आपल्या अमलाचे वेळीं धाकटा शेखसल्ला बनविलें आहे. यामुळें तें स्थान आतां धाकटा

शेखसल्ला या नांवानें प्रसिद्ध आहे. पुण्याच्या पूर्वेस कासार्ली व कुंभारली अशीं दोन खेडीं होतीं, तीं आतां पुणें शहरांत सामील झालीं आहेत. मुसलमानांच्या ताब्यांत पुणें शहर गेल्यावर इ० स० १२९० त त्यांनीं पुणेश्वर व नारायणेश्वर यांचे दोन दर्गे बनविले, त्यांना आतां धाकटा शेखसल्ला व थोरला शेखसल्ला असें म्हणतात. पुणें शहर जिंकल्यावर तेथें मुसलमानांनीं बारीआ नांवाचा एक अरब सेनापति ठेवला. त्यानें शहरा भोंवतीं एक मातीची भिंत बांधली व शहरांत शिरण्यासाठीं तीन दरवाजे ठेवले. या भिंतीचे पडके भाग अजूनही कोठें कोठें दृष्टीस पडतात. या भिंतीच्या आंतील भागास कसबा म्हणत, हीच हल्लींची कसबा पेठ. कसब्यांत लष्कर व मुसलमान रहात असत, व व्यापारी वगैरे हिंदु लोक भिंतीच्या बाहेरच्या अंगास रहात असत. पुढें शहरची वस्ती वाढत गेली, चार नवीन पेठा वसविण्यांत आल्या, दोन कसब्याच्या दक्षिणेस, एक पूर्वेस व एक पश्चिमेस. दक्षिणेकडच्या पेठांस मोहियाबाद व मलकापूर अशीं नांवें मिळालीं; यांनाच आतां आपण बुधवार पेठ व रविवार पेठ असें म्हणतों. पूर्वेकडील पेठेला अष्टपुरा म्हणत, तिलाच हल्लीं मंगळवार पेठ म्हणतात. पश्चिमेकडील पेठेला मुर्शिदाबाद असें नांव पूर्वीं देण्यांत आलें; पण आतां ती शनवार पेठ या नांवानें प्रसिद्ध आहे. मध्यंतरीं अहमदनगर व विजापूर यांच्या मध्यें ज्या लढाया झाल्या त्यांचा प्रताप बिचाऱ्या पुण्यास चांगलाच भोंवला. पुणें शहर लुटलें गेलें व तेथें भयंकर दुष्काळ पडला. इ० स० १६३० त विजापूरकरांचा सरदार मुरार जगदेव, शहाजी भोंसल्याचा पाठलाग करीत पुण्यास आला. त्यानें पुणें शहर जाळून टाकलें, तट पाडला, आणि शहरावरून गाढवांचा नांगर फिरविला. हें शहर आकाबाईच्या फेऱ्यांत सांपडलें आहे हें दाखविण्यासाठीं त्यानें तेथें एक लोखंडाची मेख ठोकली. परंतु या दुर्दशेंतूनही पुण्यानें लवकरच डोकें वर काढलें. शहाजीचा कारभारी दादाजी कोंडदेव यानें ती दुर्दैवसूचक मेख उपटून टाकली; व शहरावरून गाढवांचा नांगर फिरला होता त्याचा परिणाम नाहींसा करण्यासाठीं

त्यानें शहरांतील जमीन सोन्याच्या नांगरानें नांगरून काढली. शिवाजी महाराजांची माता जिजाबाई बाळ शिवाजीसह तेथें राहूं लागली व हल्लींही अतीशय प्रसिद्ध असलेलें कसब्यांतील गणपतीचें देऊळ त्या पुण्यशील देशभक्त जिजाबाईनें बांधलें.

पुणें शहर विजापूरच्या बादशहांकडून शहाजी राजास सन १६३५ त प्राप्त झालें. त्याच्या आधीं शहाजी भोंसले यांचे वडील मालोजी भोंसले यांना तें अहमदनगरच्या राजापासून मिळालें होतेंच. शहाजीराजे भोंसले यांच्या ताब्यांत गेल्यापासून पुण्याची भरभराट होऊं लागली. त्यांनीं पुणें ही आपल्या जहागिरीची राजधानी केली. तेथें लालमहाल नांवाचा राजवाडा बांधला व त्या वाड्यांत आपली बायको जिजाबाई व पुत्र शिवाजी यांना आणून ठेवलें. शिवाजीस शिक्षण देण्यासाठीं व आपल्या जहागिरीची व्यवस्था पाहाण्यासाठीं शहाजीराजांनीं दादाजी कोंडदेव या हुशार व स्वामिकार्यदक्ष पुरुषाची नेमणूक केली. दादाजीनें शेतकऱ्यांस उत्तेजन दिलें, शेतसारा कमी केला व शेतीची स्थिति सुधारली. यामुळें पुणें हळूहळू भरभराटीस येऊं लागलें. शिवाजी महाराज याना समजूं लागतांच त्यांनीं स्वराज्य संपादनाच्या कामास सुरवात केली व पुणे हें आपल्या स्वराज्य स्थापनेच्या उद्योगाचें व चळवळीचें केंद्रस्थान बनविलें. पुण्यास राहून आजूबाजूच्या प्रांतांवर त्यांनीं स्वाऱ्या केल्या, बराच प्रांत काबीज केला, फाटाफूट झालेल्या मराठी सरदारांची जूट बनविली. त्यांच्या साह्यानें स्वराज्याची स्थापना करून तें रंगरूपाला आणिलें. सन १६७४ पर्यंत पुणें हें स्वराज्याची राजधानी होतें. सन १६७४ त शत्रूंना हल्ला करण्यास अवघड अशा रायगड नांवाच्या किल्ल्यावर शिवाजी महाराजांनीं आपली राजधानी नेली व तेथेंच १६७४ त त्यांना राज्याभिषेक करण्यांत आला. १६७४ सनापासून संभाजी महाराजाच्या मृत्यूपर्यंत म्हणजे इ० स० १६८९ पर्यंत रायगड हीच मराठी राज्याची राजधानी होती. पुढें रायगड मोगलांच्या हातीं पडलें तेव्हां राजाराम महाराजांनीं सातारा हें राजधानीचें शहर केलें. तेव्हांपासून शाहू महाराजांच्या मृत्यूपर्यंत म्हणजे सन १७४९

पर्यंत मराठी राज्याच्या राजधानीचा खराखुरा मान साताऱ्यानें पटकावला होता. यामुळें सन इ० स० १६७४ पासून १७४९ पर्यंत बिचाऱ्या पुण्याला चुरमुरे खात बसावें लागलें. पण पुणें तें पुणें. त्यानें आपलें डोकें पुनः वर काढलें. शाहूमहाराज यांना मराठी राज्याची बिघडलेली घडी नीट बसविण्याच्या कामीं बाळाजी विश्वनाथ भट नांवाच्या हुशार मुत्सद्याची फार मदत झाली. बाळाजी विश्वनाथानें मोठ्या हुशारीनें शाहू महाराजांचें डळमळणारें सिंहासन बळकट व स्थिर केलें. शाहूमहाराजांच्या शत्रूंचा पाडाव केला, दिल्लीच्या बादशहाकडून स्वराज्याची व चौथाई व सरदेशमुखी हक्कांची सनद मिळविली व शाहू महाराजांच्या परवानगीनें पुणें प्रांतीं राहून तो मराठी राज्याचा कारभार करूं लागला. शाहूमहाराजांनीं बाळाजी विश्वनाथास आपला पेशवा म्हणजे मुख्य प्रधान केलें. बाळाजी विश्वनाथामागून बापसे बेटा सवाई असा त्यांचा पराक्रमी व शूर मुलगा बाजीराव यालाच शाहूमहाराजांनीं आपला पेशवा बनविला. बाळाजी विश्वनाथ इ० स० १७१४ त पेशवा झाला. तेव्हांपासून पुण्याचें नशीब पुनः उदयास येऊं लागलें. बाळाजीनें पुणेंशहरची सुधारणा व्हावी म्हणून बरीच खटपट केली. त्या कामीं त्याचे जिवलग मित्र अंबाजीपंत पुरंदरे यांनींही त्याला मनापासून मदत केली.

' पुणें हें आपलें मुख्य ठिकाण बनवावें ही कल्पना प्रथम बाजीरावाच्या डोक्यांत आली. त्यानें इ० स० १७२८ त आपल्या पांच प्रमुख सरदारांस वाडे बांधण्यास पुण्यास जागा आंखून दिल्या व स्वतःसाठीं सन १७३२ त शनवार पेठेंत वाडा बांधण्यास सुरवात केली. यामुळें पुण्याचें महत्त्व जगभर वाढलें. मोठमोठे व्यापारी तेथें रहावयास आले. ”

बाजीराव पुण्यास राहून सर्व हिंदुस्थानभर स्वाऱ्या करूं लागला. बाजीरावानें बांधलेला वाडा तोच सुप्रसिद्ध शनवारवाडा. याच वाड्यांत राहून पेशव्यांनीं मोंगल बादशहांस मुठींत आणून सर्व हिंदुस्तानचा कारभार केला, व पुणें शहर हें सर्व हिंदुस्तानचें राजधानीचें शहर बनविलें. बाजीरावानंतर शाहूमहाराजांनीं बाजीरावांचा मुलगा नानासाहेब यांना

वैशवाईचीं वस्त्रें दिलीं. नानासाहेबांनीं उत्तम तऱ्हेनें कारभार केला, यामुळें शाहूमहाराज खूष झाले. सन १७४९ त मरणाचे वेळीं त्यांनीं आपले मागें रामराजे यांना दत्तक घ्यावें व त्यांचे नांवानें सर्व राज्याचा कारभार तुम्हीं पहावा अशी त्यांनीं नानासाहेबांस आज्ञा केली, ती नानासाहेब यांनीं मान्य केली व मराठी राज्य अधिक वैभवास चढविलें. शाहूमहाराजांचे वंशज कर्तृत्वहीन निघाले यामुळें शाहूमहाराजांच्या मृत्यूनंतर पेशवे हेच मराठीं राज्याचे आधारस्तंभ बनले व त्यांनीं आटोकाट प्रयत्न करून व सर्व मराठी मंडळाला स्वदेशाभिमानी व कर्तव्यनिष्ठ बनवून मराठी राज्य अतीशय भरभराटीस चढविलें. पेशव्यांकडे कारभार आल्यापासून म्हणजे इ० स० १७४९ पासून पुणें हें पुनः मराठी राज्याची राजधानी बनलें. तेव्हांपासून पांढऱ्यापायाचे मूर्ख शिरोमणी पळपुटे भोजनभाऊ दुसरे बाजीराव गादीवर येई पर्यंत पुणें संपत्तीनें, वैभवानें व सुखसोयीनें अगदीं डुलत होतें. सन १७९५ त पुण्याच्या वैभवाचा व भरभराटीचा कळस झाला. सन १७९५ त वैभवशाली सवाई माधवराव यांनीं कारंजावर उडी मारून जीव दिला त्याबरोबर पुण्याच्या वैभवाचा कडेलोट झाला. दुसरे बाजीरावांच्या आचरट मूर्खपणानें पुण्याचे हाल कुत्रा देखील खाईनासा झाला; तीनदा पुणें शहर लुटलें गेलें. पुण्याची लोकसंख्या सहा लाख होती ती पाऊण लाख झाली, मराठी राज्य बुडालें व १८१८ त पुण्याच्या दुर्दैवाचा कडेलोट झाला.

# पुण्यांतील पेठा

पुणे शहरचा विस्तार फार मोठा आहे. सर्व शहरांत एकंदर अठरा पेठा आहेत. पेठा म्हणजे विभाग. सर्व पुणें शहर कांहीं एकाच वेळीं वसलेलें नाहीं. सर्वांत आधीं वस्तीचा भाग म्हटला म्हणजे ज्याला हल्लीं कसबा म्हणतात तो होय. हा भाग मुसलमानी अम्मलांत वसविला गेला. यानंतर वसलेला भाग लकडीपुलाजवळचा. हा दुसरा भाग पेशवाईत वसविण्यांत आला. अगदीं अलीकडे वसलेला भाग तो तिसरा भाग. हा तिसरा भाग माणिक ओढ्याच्या पूर्व बाजूस वसलेला आहे.

## पुणें शहरच्या पेठांचीं नांवें:—

१ कसबा पेठ
२ शनवार पेठ
३ बुधवार पेठ
४ रविवार पेठ
५ शुक्रवार पेठ
६ नारायण पेठ
७ सदाशिव पेठ
८ गणेश पेठ
९ गुरुवार पेठ उर्फ वेताळ
१० रास्ता पेठ
११ सोमवार पेठ
१२ न्याहाल पेठ
१३ नानाची पेठ
१४ भवानी पेठ
१५ मुजफरजंग पेठ
१६ गंज पेठ
१७ घोरपडे पेठ
१८ मंगळवार पेठ

आतां आपण प्रत्येक पेठेंतील प्रसिद्ध व प्रेक्षणीय स्थळें पाहूं या.

# कसबा पेठ

या पेठेचें क्षेत्रफळ ५७५००० यार्ड आहे, व लोकसंख्या १२२०४ आहे. ही सर्वांत जुनी पेठ आहे. या पेठेंत पुरंदरे, पेठे वगैरे जुन्या सरदारांचे सुंदर भव्य वाडे आहेत. त्याचप्रमाणें प्राचीन काळापासून बरींच वैदिक घराणीं या पेठेंत राहिलेलीं आहेत. ही पेठ असावी तितकी स्वच्छ नाहीं, व ही पेठ फार उंच भागीं वसलेली आहे यामुळें येथें नळाचें पाण्याला जोर कमी असतो. पण अलीकडे इतर पेठांत मलेरियाचा म्हणजे हिंवतापाचा जसा फैलाव झाला आहे तसा या पेठेंत नाहीं. इतर पेठांप्रमाणें या पेठेंतील हवा दमट नाहीं. या पेठेंतील रस्ते अरुंद व वांकडे तिकडे आहेत. या पेठेंत पहाण्यासारखीं स्थळें म्हटलीं म्हणजे, श्री. जिजाबाईनी बांधलेलें गणपतीचें देऊळ, अंबरखानाबाग, पुरंदरे व पेठे यांचे वाडे, व परवा प्रिन्स ऑफ वेल्स यांनीं बसविलेला श्रीशिवाजी महाराज यांच्या स्मारकाचा दगड.

## १ श्री गणपतीचें देऊळः—

ह्या देवळांतील गणपतीची मूर्ति स्वयंभू आहे. या देवळांतील मूर्ति विषयीं अशी एक दंतकथा आहे कीं एके दिवशीं बरेचसे गुराखी आपलीं गुरें नदीच्या कांठीं चरावयास सोडून गोट्या वगैरे खेळत एकत्र बसले होते. खेळतां खेळतां त्यापैकीं एकाचें लक्ष्य सहज जवळ असलेल्या खडकाकडे गेलें. तेव्हां त्या खडकावर गणपती सारखी खोदलेली मूर्ति त्याला दिसली. लगेच त्यानें ती गोष्ट आपल्या सोबत्यांना सांगितली. त्यांनाही त्याच्याप्रमाणेंच ती खडकावरली आकृति गणपतीची आहे असें वाटलें. मग त्या सर्वांनीं शेंदूर आणला व त्या खडकांत खोदलेल्या मूर्तीला लावला. व त्या दिवसापासून मोठ्या भक्तिभावानें ते त्या देवाची रोज पूजा करूं

लागले. ही हकीकत सर्व गांवांत कळली, व गावांतील लोक त्या देवाच्या दर्शनास येऊं लागले. बायका व पुरुष आपल्या मनांतील इच्छा पूर्ण करण्यासाठीं गणपतीला नवस करूं लागले, व गणपती त्यांच्या नवसास पावूं लागला. हा देव नवसास पावतो अशी त्याची जिकडे तिकडे कीर्ति पसरली. महाप्रतापशाली शिवाजी महाराज यांची माता स्वराज्याची जननी जिजाबाई ही त्यावेळीं पुण्यास कसबा पेठेंत आपल्या लालमहाल नांवाच्या राजवाड्यांत शिवाजी बाळाला घेऊन रहात असे. तिच्या कानावर गणपतीच्या प्रभावाची कीर्ति गेली. तेव्हांपासून ती भक्तीनें त्या देवाचें दर्शन घेण्यास रोज जाऊं लागली. तिनें त्या देवाचें एक टुमदार देऊळ बांधलें व त्या देवळासंबंधी सर्व खर्च ती स्वतः सोसूं लागली. नंतर व्यवहारे नांवाच्या थोर गृहस्थांनीं लहानसा गणपतीपुढें एक सुंदर सभामंडप बांधला. अलीकडे रा. रा. गजाननपंत दिक्षीत या नांवाच्या श्रीमंत गृहस्थांनीं एक भव्यसभामंडप बांधला आहे. यामुळें देवळाला जास्त शोभा आली आहे. सन १८७७ सालीं या देवळाच्या आवारांत एक सार्वजनिक हौद बांधण्यांत आला. कोणतेंही मंगलकार्य करावयाचें झालें म्हणजे विघ्नांचा नाश करण्याकरतां विघ्नहर्त्या विघ्नेश्वर गणपतीला आमंत्रण करण्याची आपणा हिंदूंची फार पुरातन वहिवाट आहे. त्या वहिवाटीला अनुसरून पुणें शहरांतील सर्व हिंदू लोक या कसब्यांतील गणपतीला जातात व देवाला अक्षत देतात व आमंत्रण करतात. विशेषतः मुंज करावयाची असली किंवा लग्न करावयाचें असलें म्हणजे प्रथम कसब्याच्या गणपतीला अक्षत देण्यासाठीं आपापल्या ऐपतीप्रमाणें सुंदर पोषाख करून व नटून थटून मोठ्या आनंदानें नरनारी बँडच्या सुस्वर आवाजांत, चौघडा झडत असतां, रमत गमत मोठ्या भक्ति प्रेमानें कसब्यांतील श्रीमन्महागणाधिपतींना आपल्या घरच्या मंगलकार्याला आमंत्रण करण्यासाठीं अक्षत देण्यास जातात व अक्षत देणें झाल्यावर तितक्याच थाटानें घरीं परत येतात. अक्षतींच्या ह्या मिरवणूकी फारच प्रेक्षणीय असतात. त्यांत बहुतकरून पुरुषांपेक्षां बायकांचाच भरणा अधिक असतो; याचें कारण पुरुषांपेक्षां सर्व थाट-

थाटांची, टामडौलाची, नटण्याथटण्याची किंवा आपल्या वैभव प्रदर्शनाची हौस आमच्या महिलाजनांना अधिक. हल्लीं सर्व युरोपखंडाला पुढारी पणानें नवीन फॅशन लावून देण्याचें काम फ्रान्स देशांतील पॅरिस नगरींतील युवती करीत असतात. अगदीं नव्यांत नवी फॅशन किंवा टूम कोणती हें पहावयाचें असल्यास पॅरिसला जावें व तेथील युवतींचा नयनमनोहर पोषाख पहावा म्हणजे झालें. आमच्या इकडे पुणें शहर हें आमच्या महाराष्ट्राचें पॅरिसनगर आहे. पोषाखांत किंवा डागडागिन्यांत नवीन फॅशन अथवा टूम पुण्यनगरीच्या हौशी महिला प्रथम घालून देतात. त्याचें प्रदर्शन प्रथम वैशाखमासीं या कसब्याच्या गणपतीला अक्षत देण्यासाठीं काढलेल्या मिरवणुकींत करण्यांत येतें. सर्व महाराष्ट्रांतील महिला पुण्यास वैशाखांत होणाऱ्या हजारों लग्नांसाठीं सहज आलेल्या असतातच. त्या मग परत जातांना ही नवीन फॅशन पाहून आपापल्या गांवीं जातात व तेथें या फॅशनचा फैलाव आपल्या भगिनींमध्यें करतात अशा तऱ्हेनें हं हं म्हणतां पुण्यास सुरू झालेली फॅशन उर्फ टूम सर्व महाराष्ट्रभर पसरते. अशा रीतीनें आज किती तरी वर्षें सर्व महाराष्ट्रमहिलांवर पुण्यनगरीच्या तरुण स्त्रिया राज्य करीत होत्या. पण अलीकडे हा आपला अधिकार आपखुशीनें त्यांनीं नाट्यकुशल बालगंधर्वांना देऊन टाकला आहे. बालगंधर्व प्रथम आपल्या नव्या फॅशनचें प्रदर्शन किर्लोस्कर थिएटरमध्यें करतात. मग तेथें जमलेल्या शेंकडों रसिक व गुणग्राहक युवती डोळे भरून तें प्रदर्शन पाहतात व लगेच आपल्या केशरचनेंत, पोषाखांत, व डागिन्यांत बालगंधर्वांची ती नवीन फॅशन आणून सोडतात. आजकाल बालगंधर्व हे सकल महाराष्ट्र महिलांवर फॅशनच्याबाबतींत राज्य करीत आहेत. सोनार देखील नथ गुंफावयास सांगितल्यास गंधर्व फॅशनची पाहिजे का साधी पाहिजे असें आधीं विचारतात. असो लग्न मुंजीच्या हंगामांत कसब्यांतील गणपतीचें देऊळ शेंकडों अक्षतांनीं अगदीं गजबजून जातें. अशा या लोकमान्य देवळाला पर्वती संस्थानांतून फक्त ५ रुपये महिना मिळतात. या देवालयांतील गणेश चतुर्थीच्या उत्सवाचा खर्चही पर्वतीच्या संस्थानाकडूनच होतो.

(२) **अंबरखाना**—या ठिकाणीं पूर्वी छत्रपती श्री शिवाजी महाराज यांचे वडील शहाजी राजे भोंसले यांनीं लालमहाल नांवाचा वाडा इ० स० १६३६ त बांधला होता. त्या वाड्यांत बरींच वर्षें श्री. जिजाबाई म्हणजे शिवाजी महाराज यांची आई, आपल्या शिवबाळाला घेऊन रहात असत. शिवाजी महाराजांचें बाळपण याच वाड्यांत गेलें. याच वाड्यांत दादाजी कोंडदेव यानें शिवरायांना शिक्षण दिलें. याच वाड्यांत शिवरायांनीं स्वराज्याचें संपादन कसें करावें याचा विचार केला, व याच वाड्यांत शिवाजी महाराजांनीं स्वराज्य संपादनाच्या खटपटीचा कार्यक्रम आंखला. इ० स० १६७४ पर्यंत म्हणजे रायगडात राज्याभिषेक होईपर्यंत शिवाजी महाराजांचें हाच राजवाडा निवासस्थान होतें. म्हणजे याच वाड्यांत राहून स्वराज्याची घटना शिवरायांनीं केली. यामुळें महाराष्ट्राला व मराठ्यांना हें स्वराज्याचें उगमस्थान, ही स्वराज्याची जन्मभूमि एकदां तरी पहावी, व हें पवित्र क्षेत्र पाहून आपणास पुनीत करून घ्यावें असें वाटावें हें साहाजिकच आहे. हल्लीं या ठिकाणीं पडीक घरें काढून टाकून व येथील गलिच्छपणा नाहींसा करून म्युनिसिपालिटीनें येथें हवा खाण्यासाठीं एक सुंदर बाग बनविला आहे. त्यांत सायंकाळीं पुष्कळ लोक हवा खाण्यास येत असतात. पण हें स्वराज्याचें उगमस्थान आहे, ती शिवभूपतींच्या सहवासानें अत्यंत पवित्र व वंदनीय झालेली पुण्यभूमि आहे हें कोणाच्या ध्यानीं मनीं देखील येत नाहीं. तें सर्वांच्या चटकन लक्ष्यांत यावें अशी तजवीज करणें हें प्रत्येक राष्ट्रभक्ताचें आद्य कर्तव्य आहे.

(३) **शिवाजी महाराजाचें स्मारकः**—सन १९१४ पासून सन १९१८ अखेर पर्यंत जें महायुद्ध झालें त्यांत मराठे वीरांनीं अलौलिक पराक्रम केला. या गोष्टीचें स्मरण रहावें व त्या बरोबरच श्री शिवाजी महाराज यांचें स्मरण व्हावें म्हणून एक भव्य इमारत बांधावयाची आहे. त्याच्या पायाचा दगड इ० स० १९२१ च्या अखेरीस प्रिन्स ऑफ वेल्स यांचे हस्तें अतीशय मोठा समारंभ करून बसविण्यांत आला. त्यावेळीं श्री.

शिंदेसरकार, श्री शाहू छत्रपती कोल्हापूरसरकार वगैरे सर्व बडे संस्थानिक व इतर थोर गृहस्थ हजर होते. हें ठिकाणही प्रत्येक खऱ्या महाराष्ट्रीयाला एक पुण्यक्षेत्रच बनेल यांत बिलकुल संशय नाहीं.

( ४ ) **पुरंदरे यांचा वाडा:**—शाहूमहराजांचा उजवा हात, मराठी राज्याची पुन: नीट घटना करणारे पेशवे बाळाजी विश्वनाथ हे कोंकणांतून देशावर आले तेव्हां ज्या देशभक्तानें त्यांना प्रथम मनोभावानें प्रेमपुरःसर सहाय केलें त्यांचें नांव महादाजीपंत पुरंदरे. या दोघांची मैत्री अखेरपर्यंत कायम होती, इतकेंच नव्हे तर यांच्या वंशजांनीं म्हणजे पेशव्यांनीं व पुरंदऱ्यांनीं एकमेकांवर निष्कपटपणें, व निस्वार्थी प्रेम केलें. अशीं उदाहरणें जगांत क्वचितच पहावयास मिळतात. जेव्हां बाळाजी विश्वनाथ पेशवे झाले तेव्हां आपलें पूर्वीचें प्रेम स्मरून त्यांनीं महादाजी पुरंदरे यांना आपले मुतालिक म्हणजे कारभारी केलें. व कसब्यांत आपल्या जवळच वाडा बांधण्यास जागा दिली. इ० स० १७४० त पुरंदऱ्यांनीं तेथें एक वाडा बांधला. त्याला ५०००० रुपये खर्च आला. यांच वाड्यांत हल्लींही या थोर पुरंदरे सरदारांचे सुशील व देशभक्त वंशज रहात आहेत. हाही वाडा एकदां तरी प्रत्येक देशाभिमानी महाराष्ट्रीयानें अवश्य अवलोकन करावा.

( ५ ) **पेठ्यांचा वाडा:**—हा वाडा पेठे या सरदार घराण्याचा आहे. या घराण्याचा मूळ पुरुष कृष्णाजीपंत पेठे हा होय. त्यांचा मुलगा त्रिंबकराव मामा या नांवानें इतिहासांत सुप्रसिद्ध आहे. हा त्रिंबकराव मामा सदाशिवराव भाऊसाहेब पेशवे यांचा सख्खा मामा. याच त्रिंबकराव मामानें हा पेठ्यांचा वाडा बांधला. हा वाडा तिमजली आहे. याची बांधणी मजबूत व सुबक आहे. या वाड्यांतील एका दिवाणखान्याच्या भिंतीवर सोनेरी रंगानें काढलेलीं सुंदर चित्रें होतीं. हा वाडा बांधणारे सुप्रसिद्ध त्रिंबकराव मामा पेठे हे म्हैसूरचा टिपू सुलतान याचे बरोबर लढत असतां इ० स० १७७४ त मारले गेले. इंग्रज सरकारकडून या घराण्याला सालीना दोन हजार रुपये मिळतात.

(६) शेख सल्ल्याचा दरगा:—या नांवानें प्रसिद्ध असलेली जागा मुळानदीच्या पूर्व किनाऱ्यावर आहे. या ठिकाणीं दोन थडगीं आहेत. एकाला थोरला शेखसल्ला म्हणतात व दुसऱ्याला धाकटा शेखसल्ला म्हणतात. हे दर्गे फार जुने आहेत. या ठिकाणीं सुमारें सवा आठशें वर्षांपूर्वी दोन हिंदु देवळें होतीं, एक नारायणेश्वराचें व दुसरें पुण्येश्वराचें. इ० स० १२९० त हिस्सा मोहिदीन कलाल या नांवाचा फकीर आणखी चार फकीरांना घेऊन दिल्लीहून पुण्यास आला. या फकीरांनीं या देवळांतील देवाच्या मूर्ति नदींत फेंकून दिल्या, देवळें पाडलीं, व तेथें एक मशीद बांधली. पुण्येश्वराचें देऊळ त्यावेळेपासून शेखसल्ल्याचा दर्गा या नांवानें प्रसिद्ध झालें, व नारायणेश्वराचे देवळाचे जागीं शेखहिस्साचा दर्गा आला. त्यावेळच्या मुसलमानी राजांनीं या दर्ग्यांना येरवडें व कळस या नांवाचीं दोन गांवें इनाम दिलीं. गांवाच्या उत्पन्नांतून या दर्ग्यांचा खर्च चालत असे. पुढें मुसलमानांचें राज्य बुडालें व मराठ्याच्या सत्तेखालीं पुणें आलें. तेव्हां मराठी राजांनीं त्या दर्ग्यांकडून हीं गांवें काढून घेतलीं. धाकट्या शेखसल्ल्याचे दर्ग्यांत पुष्कळ लहान मोठीं थडगीं आहेत. त्यांत सर्वांत मोठें थडगें औरंगझेब बादशहाचा नातू मोहिलुलमुलुक याचें आहे.

## शनवार पेठ.

---

ही पेठ सतराव्या शतकाचे अखेरीस मुसलमानांनीं वसविली. त्यांनीं या पेठेला मुर्जुदाबाद हें नांव दिलें. हें नांव पुढें पेशव्यांनीं बदललें व या पेठेला हल्लीं चालत असलेलें शनवार पेठ हें नांव दिलें. शहरांतील निरनिराळ्या भागांना आठवड्याच्या वारांचीं नांवें देण्याची पद्धत इतर कोठें फारशी प्रचारांत नाहीं. तेव्हां सहजच ही पद्धत पेशव्यांनीं नवीनच सुरू केली काय, असा विचार मनांत येतो. बराच विचार केल्यावर असें स्पष्ट दिसून येतें कीं ही पद्धत पेशव्यांनीं नवीन काढली नसावी. ही पद्धत त्यांनी आपले धनी जे शाहूमहाराज छत्रपति यांच्या सातारा ह्या राजधानी वरून

उचलली असावी. सातारा शहरांतील निरनिराळया पेठांना वारांचीं नांवें दिलेलीं पेशव्यांनीं पाहिलीं असावीं, व आपल्या धन्याच्या त्या मुख्य राजधानीचा नमुना पुढें ठेवून त्याप्रमाणें पुणें शहर बनवावयाचें असा बाजीराव पेशव्यांनीं बेत केला असावा व या त्यांच्या प्रिय पेठेचें मुर्जुदाबाद हें मुसलमानी नांव काढून टाकून साताऱ्याहून आणलेलें शनवार पेठ हें नांव त्यांनीं दिलें असावें. आठवड्याचे वार सात. त्या सातही वारांच्या नांवाच्या पेठा या पुणें शहरांत आहेत. मात्र गुरुवार पेठेचें तें गुरुवार हें सुंदर नांव जाऊन त्या बिचाऱ्या पेठेच्या कपाळीं वेताळ पेठ हें भुताटकीचें नांव आलें आहे. देव करो व या पेठेचें पहिलें सुंदर गुरुवार पेठ हें पवित्र नांव तिला प्राप्त होवो. बाकी शनवार, रविवार, सोमवार, मंगळवार, बुधवार व शुक्रवार या पेठांनीं आपलीं वारांचीं नांवें कायम ठेवलीं आहेत.

असो आतां शनवार पेठेकडे वळूं. प्रभावशाली बाजीराव यांनीं मुर्जुदाबाद हें मुसलमानी सत्तेचें दर्शक असें या पेठेचें नांव काढून टाकलें व हिंदूसत्तेचें दर्शक असें शनवार पेठ हें नांव या पेठेला दिलें हें वर सांगितलेंच आहे. या पेठेचें क्षेत्रफळ सुमारें ४४५००० चौरस यार्ड आहे, व येथील लोकसंख्या ९२१४ आहे. या पेठेंतील वस्ती दुसऱ्या बाजीरावांच्या कारकीर्दींत सपाटून वाढली. या पेठेंत मुख्य ऐतिहासिक व महत्त्वाचें ठिकाण म्हणजे शनवार वाडा.

**शनवार वाडाः**—सर्व महाराष्ट्रांत हा वाडा आपल्या वैभवानें, चढामोडींनीं, व मोठमोठ्या प्रसंगांनीं गाजलेला आहे. हिंदुस्थानावर मराठ्यांचें साम्राज्य पसरल्यावर पुणें हें सर्व हिंदुस्थानचें राजधानीचें शहर बनलें, व सर्व पुण्यांत हा पेशव्यांचा शनवार वाडा सर्व कारभाराचीं सूत्रें हलविण्याचें मुख्य ठिकाण, व साम्राज्याचे दरबार भरविण्याचें केंद्र बनला. या वाड्याची मुहूर्त मेढ रणशूर थोरले बाजीराव यांनीं रोवली. हें सुमंगल काम एका सुमुहूर्तावर करण्यांत आलें. थोरल्या बाजीरावांनीं ही मुहूर्त मेढ इ० स० १७३०च्या जानेवारी महिन्याच्या १० व्या

तारखेस शनवारीं रोंवली. थोरल्या बाजीरावसाहेबांनीं हीच जागा आपला दिग्विजयी वाडा बांधण्यास कां पसंत केली याविषयीं एक मनोरंजक दंतकथा लोकांत प्रचलित आहे ती अशी:—

एक दिवस आपल्या खंद्या घोड्यावरून बाजीराव साहेब या जागेवरून दौडत जात होते. इतक्यांत या जागीं एक विलक्षण व अभूतपूर्व चमत्कार त्यांच्या दृष्टीस पडला. एक ससा मोठ्या शौर्यानें एका कुत्र्याच्या पाठीस लागला होता, व कुत्रा जीव घेऊन पळत होता. नेहमीं म्हटलें म्हणजे सशानें भेकडपणानें पळत सुटावें व कुत्र्यानें त्याच्या पाठीस लागावें असा प्रकार असावयाचा, पण याच्या अगदींच विरुद्ध प्रकार दृष्टीस पडल्यामुळें बाजीराव साहेब अगदीं आश्चर्यचकित झाले. या प्रकाराकडे—या सशा कुत्र्यांच्या धरपकडीकडे—त्यांचें चित्त वेधलें, व पुढें कोणाची सरशी होते तें पहावें असें वाटून त्यांनीं आपला घोडा त्या सशाच्या पाठीमागें नेला व तो अलौकिक संग्राम ते पहात राहिले. बराच वेळ पाठलाग केल्यावर त्या शूर सशानें त्या कुत्र्याला पकडलें. कांहीं वेळ कुत्र्यानें सशाला दाद दिली नाहीं. पण सरतेशेवटीं त्या सशानें त्या कुत्र्याचा पूर्ण पाडाव केला व त्याला ठार मारलें. हा जगाच्या नियमाच्या अगदींच विरुद्ध झालेला प्रकार पाहून बाजीराव साहेबांची मति अगदीं गुंग होऊन गेली. हें असें कां झालें, जगाच्या आरंभापासून भेकडपणाविषयीं प्रसिद्ध असलेल्या सशाला इतकें शौर्य कोणीं आणून दिलें, त्याला एवढा हिम्मत बहाद्दर कोणीं बनविलें याचा ते विचार करीत बसले. विचारा अंतीं हा या जागेचाच प्रभाव असला पाहिजे असें त्यांनीं ठरविलें. असें ठरतांच ही जागा आपल्या वाड्याला योग्य आहे, कारण आपणांला प्रबल अशा मोंगल बादशाहीशीं झगडावयाचें आहे तेव्हां ज्या प्रमाणें अधिक प्रबल अशा कुत्र्याचा पराभव या जागेच्या प्रभावानें दुर्बळ अशा सशाला करतां आला, त्याच प्रमाणें या जागेच्या प्रभावानें प्रबल मोंगल बादशाहीवर मराठ्यांना जय मिळवितां येईल. असा विचार करून थोरल्या बाजीरावांनीं त्या जागीं वाडा बांधविण्याचें ठरवून मुहूर्त मेढ रोंवली.

थोरल्या बाजीराव साहेबांच्या कल्पनेप्रमाणेंच ती जागा मराठ्यांना धारजिणी झाली. त्या जागेवर वाडा बांधून राहिल्यावर पेशव्यांनीं उत्तरोत्तर अधिकाधिक यश संपादन केलें, व सरते शेवटीं तर मोंगल बादशहा म्हणजे आपल्या हातांतलें बाहुलें बनवून अखिल भरत खंडावर राज्य केलें. या जागेचा मान श्रीमंत सवाई माधवराव पेशवे यांच्या पर्यंत उत्तम ठेवला गेला होता. त्यामुळें मराठ्यांचें वैभव कळसास पोहोंचलें. पण श्रीमंत सवाई माधवराव साहेब पेशवे अकालीं अपघातानें सन १७९५ त मरण पावले व द्विवटे, पळपुटे धाकटे बाजीराव पेशवे झाले. त्यांना भिकेचे डोहाळे आठवले. त्यांना तो शनवार वाडा नकोसा झाला. त्यांनीं बुधवार वाडा व विश्रामबाग असे नवे वाडे बांधले व अशा तऱ्हेनें शनवार-वाड्याचा व त्या पुण्यभूमीचा, व पराक्रमी भूमीचा अपमान व त्याग केला. त्याबरोबर पारडें फिरलें. धाकट्या रावबाजीच्या या व अशाच मूर्ख कृत्यांनीं सन १८१८ त मराठी राज्य बुडालें. तेव्हां एखाद्या जागेचा कसा प्रभाव असतो तो पहा ! बरें नुसती प्रभावशाली जागा असली तरी तिचें नशीब काढणारा पराक्रमी पुरुष लागतोच. थोरल्या बाजीरावांच्या नजरेस त्या जागेचा प्रभाव आला तोंपर्यंत त्या जागेचें भाग्य उदयास आलें नव्हतें. त्या जागीं कांहीं कोळी व कांहीं कोष्टी झोंपड्या बांधून राहिले होते. बाजीरावसाहेबांनीं त्या कोळी कोष्टी मंडळींचीं मनें वळवून त्यांना सुखसोयींची तितकीच जागा मंगळवार पेठेंत देऊन त्यांचेपासून ती पांच एकर जागा संपादन केली. अशा तऱ्हेनें गुणी भूमी व गुणग्राहक पराक्रमी पुरुष यांची जोडी जमली व त्यामुळें त्या जागेचें नशीब उदयास आलें. सर्वच कामें थोरले बाजीरावसाहेब धडाडीनें करीत; त्याप्रमाणें या ठिकाणीं अवघ्या दोन वर्षांत बाजीरावसाहेबांनीं मराठी साम्राज्याचें केंद्रस्थान बनणारा दुमजली व तीन चौकी भव्य वाडा उठविला. या वाड्याची वास्तुशांति, व प्रवेशसमारंभ ता. २२ जानेवारी सन १७३२ रोज शनवार या दिवशीं मोठ्या थाटानें झाला. हा वाडा बांधावयास बाजीराव साहेब यांना १६११० रुपये खर्च आला. शनवार व हा वाडा यांचा कांहीं

विलक्षण संबंध दिसतो. हा वाडा बांधण्याचें काम शनवारींच सुरू झालें व त्याचा प्रवेश समारंभही शनवारींच झाला, त्याला शनवार वाडा हेंच नांव पडलें, व तो वाडा ज्या पेठेंत आहे त्या पेठेलाही शनवार पेठ हेंच नांव देण्यांत आलें.

थोरले बाजीराव साहेब यांनीं बांधलेला हा वाडा साधाच होता. त्यांत नकशीकाम असें फक्त एका दिवाणखान्यांतच होतें. थोरल्या बाजीरावांचे मागून त्यांचे चिरंजीव बाळाजी बाजीराव उर्फ नानासाहेब हे पेशवे झाले ( १७४०–१७६१ ). त्यांनीं मराठी राज्याचा विस्तार व वैभव वाढविलें, व पुणें हें मराठीं साम्राज्याचें खरेंखुरें केंद्रस्थान बनविलें. अर्थातच, थोरल्या बाजीरावांच्या वेळच्या कारभाराला पुरेसा तो पूर्वींचा वाडा, पुढल्या वाढलेल्या विस्ताराच्या साम्राज्याला अपुरा वाटला यामुळें नानासाहेब पेशव्यांनीं अपार संपत्ती व चातुर्य खर्च करून त्या वाड्याचें सौंदर्य व विस्तार अतीशय वाढविला. यानंतर बरींच वर्षें वाड्यांत कांहीं नवीन वाढ झाली नाहीं. सवाई माधवरावांचे कारकीर्दीतील ( १७७४–१७९५ ) सुप्रसिद्ध कुशल मुत्सद्दी व कारभारी नाना फडणीस यांनीं, या वाड्याला आणखी शोभा व आणखी भव्यपणा आणला. नाना फडणिसांनीं पुष्कळ नवीन महाल, गच्च्या, मनोरे, कारंजीं वगैरे बांधलीं व अशा तऱ्हेनें हिंदुस्तानचीं सूत्रें हलविणाऱ्या राज्यकर्त्यांना शोभेल असा तो वाडा बनविला.

सवाई माधवरावांचे वेळेला वाड्यांतील मुख्य इमारत सहा मजली होती. ही इमारत इतकीं उंच होती कीं तिच्या गच्चीवरून श्री क्षेत्र आळंदी येथील देवळाचा कळस दिसत असे. श्रीमंत सवाई माधवराव पेशवे यांना सृष्टि सौंदर्याचे देखावे पहाण्याची व आकाशांतील तारे व नक्षत्रें पहाण्याची फार आवड असे. ती त्यांची आवड या इमारतींतील आपल्या मेघडंबरी नांवाच्या अत्युच्च महालाच्या गच्चीवर बसून ते पुरी करून घेत असत. पेशव्यांच्या दरबारीं सर चार्लस मॅलेट नांवाचे एक विद्वान इंग्रजी वकील होते. त्यांनीं श्रीमंत सवाई माधवरावांना एक चांगली दुर्बीण नज

दिली होती. त्या दुर्बीणींतून आकाशांतील ताऱ्यांचें सौंदर्य पहाण्यांत ते तासचे तास सर्वांत उच्च अशा वाड्यांतल्या गच्चीवर बसत असत.

पेशव्यांच्या अत्यंत भरभराटीच्या काळीं हा वाडा अतीशय भव्य, वैभवशाली, विशाळ, सुंदर व सर्व सुखसोयींनीं युक्त असा होता. सन १८१८ त मूर्ख व पळपुट्या धाकट्या बाजीरावांच्या बेअकलीपणानें पेशवाई बुडाल्यानंतर नऊ वर्षांनीं म्हणजे इ० स० १८२७ च्या जानेवारी महिन्याच्या सत्ताविसाव्या तारखेस या वाड्यास आग लागली. हा वाडा सारखा एक आठवडा जळत होता. या भयंकर आगींतून वाड्याचा एकच भाग बचावला होता, तो ऐने महाल उर्फ आरसे महाल. तो तरी नीट काळजीनें जपून ठेवला असता तर आम्हा महाराष्ट्रीयांचे डोळ्यांस तेवढा तरी पाहून समाधान वाटलें असतें. परंतु ऐतिहासिक इमारती जपून रक्षण करावया ही रसिकता त्या वेळच्या अधिकाऱ्यांत नसल्यामुळें तो महालही लवकरच जमीनदोस्त झाला. जवळ जवळ शंभर वर्षें त्या वाड्याचा कांहीं गतवैभव सूचक अवशेष आहे का नाहीं हें पहाण्याची बुद्धि कोणासही झाली नाहीं. मुंबई इलाख्याचे गवर्नर सर जॉर्ज लॉइड यांना मराठ्यांच्या प्राचीन वैभवाचें केंद्रस्थान जो हा पेशव्यांचा शनवार वाडा त्याविषयीं फार आदर वाटत असे. आपल्या कारकीर्दीच्या आरंभापासूनच वाड्याच्या आवारांत [illegible] शंभर वर्षें पडलेले पर्वतप्राय दगड मातीचे ढिगार अतोनात खर्च करून [illegible]ण्याचें व खालीं दडून राहिलेले वाड्याचे अवशिष्ट भाग आम्हां महाराष्ट्रीयांस व गुणग्राहक परकीयांस कौतुकानें पहाण्यास सुलभ करण्याचें काम आर्केऑलॉजिकल खात्यामार्फत झपाट्यानें गव्हर्नर साहेबांनीं चालू केलें. यामुळें या वाड्याच्या गतवैभवाची किंचित अंधुक कल्पना त्याच्या शिल्लक असलेल्या व हल्लीं मोकळ्या केलेल्या जोत्यावरून येते.

ह्या वाड्याचें सुंदर भव्य स्वरूप पहाणें आतां शक्य नाहीं. या वाड्याचें यथातथ्य वर्णनही आपल्या जुन्या बखरींत सविस्तर आढळत नाहीं. निरनिराळ्या बखरींत प्रसंगानुसार या वाड्याचें थोडथोडें वर्णन आलें आहे

निरनिराळया इंग्रजी प्रवाश्यांना व मुत्सद्यांना निरनिराळया प्रसंगीं हा वाडा पहावयास सांपडला. त्यांनीं या वाड्याचें सुंदर वर्णन लिहून ठेवलें आहे. निरनिराळया ठिकाणची ही माहिती एकत्र करून प्रत्यक्ष दर्शन होणें अशक्य झाल्यामुळें हिरमोड झालेल्या महाराष्ट्रीयांसाठीं त्याचें वर्णन येथें देतों:—या वाड्यानें एकंदर पांच एकर जमीन व्यापली होती. या वाड्याला तट बांधण्याचें काम थोरल्या बाजीरावांनीं सुरू केलें व उत्तरेच्या बाजूला दिल्लिदरवाजा बांधण्याचें काम सुरू केलें. पण पेशव्यांचे धनी शाहूमहाराज यांना तें आवडलें नाहीं. दिल्लीकडे तोंड करून असा दरवाजा बांधण्यानें दिल्लीच्या बादशहांचा अपमान होतो यासाठीं तें काम बंद करावें असें त्यांनीं कळविलें. त्यांची इच्छा व आज्ञा शिरसामान्य करून थोरल्या बाजीराव साहेबांनीं काम तावडतोब बंद केलें. तें शाहूमहाराजांच्या मृत्यू पर्यंत तसेंच पडून राहिलें. नंतर दुसरे पेशवे बाळाजी बाजीराव उर्फ नानासाहेब यांनीं हल्लीं दिसत असलेला भव्य व मजबूत दिल्ली दरवाजा बांधला. या वाड्याच्या तटास एकंदर पांच दरवाजे होते, त्यांचीं नांवें:—

१ दिल्ली दरवाजा—या दरवाज्याचें असें नांव पडण्याचें कारण हा दरवाजा उत्तराभिमुख आहे व दिल्ली उत्तरेस आहे, म्हणून दिल्लीकडे तोंड करणारा म्हणून दिल्ली दरवाजा.

२ गणेश दरवाजा—सुप्रसिद्ध गणपती महालाजवळ हा दरवाजा होता म्हणून याचें नांव गणेश दरवाजा असें ठेवलें.

३ मस्तानी दरवाजा—जुन्या बखरींत नाटकशाळा दरवाजा असें म्हटलें आहे. थोरले बाजीरावांची ठेवलेली अत्यंत सुंदर बायको मस्तानी हिच्यावरून या दरवाज्याला हें नांव पडलें. ही स्त्री बुंदेल खंडच्या छत्रसाल राजाकडून थोरल्या बाजीरावांस प्राप्त झाली होती.

४ खिडकी दरवाजा—हा दरवाजा नेहमीं बंद असे व या दरवाज्याला असलेल्या खिडकींतून जावें यावें लागे म्हणून याला खिडकी दरवाजा असें नांव पडलें. याच्या जवळ एक कवठीचें झाड वाढलें म्हणून याला हल्लीं कवठीचा दरवाजा असें नांव पडलें आहे.

५ जांभूळ दरवाजा—जवळ असलेल्या एका जांभळीच्या झाडावरून याला हें नांव पडलें. वाड्याच्या तटाला चार भिंतीं पैकीं दोन, दोनशें फूट लांब आहेत व, दोन १५० फूट लांब आहेत. तट वीस फूट उंच आहे. या तटाला एकंदर नऊ बुरुज आहेत. त्यांपैकीं चार, चार कोंपऱ्यांना व पांच, तटाच्या भिंतींत आहेत. सर्व तटावर एकंदर २७५ शिपाई पहाऱ्यासाठीं ठेवलेले होते.

वाड्याला एकंदर चार चौक होते. वाड्यांत पुष्कळ भव्य दिवाणखाने होते. त्यापैकीं खालील विशेष महत्त्वाचे होते:—

१ गणपती रंगमहाल—दरबार हॉल

२ नानांचा दिवाणखाना—

३ आरसे महाल

४ जुना आरसे महाल

५ दादा साहेबांचा दिवाणखाना—रघुनाथराव पेशवे यांचा दिवाणखाना

६ थोरल्या रावांचा दिवाणखाना—थोरल्या बाजीरावांचा दिवाणखाना

७ नारायणरावांचा महाल—नारायणराव पेशव्यांसाठीं बांधलेला महाल.

८ हस्तिदंती महाल.

या शिवाय पेशव्यांच्या कुटुंबांतील निरनिराळ्या व्यक्तींना दालनें दिलेलीं होतीं. जवाहीरखाना, कोठी, दप्तर, पुस्तक संग्रह वगैरे साठीं निराळीं दालनें होतींच. वाड्यांतील बंदोबस्ताकडे एकंदर ३१४४ नोकर होते. या शिवाय रात्रंदिवस नोकरीवर असलेले २०० ते ५०० स्वार होते ते निराळेच.

**दिवाणखान्याची बांधणी:**—सर्व दिवाणखान्यांची बांधणी एकाच घाटाची म्हणजे कलमदानासारखी होती. दिवाणखान्यांतील खांबावर सुबक खोदकाम केलेलें होतें. तक्तपोशीवर सुंदर फळें, झाडें किंवा महाभारत रामायण वगैरे काव्यांतले निरनिराळे प्रसंग रंगविलेले होते. या

दिवाणखान्यांतील चित्रें काढण्यासाठीं जयपूरचा सुप्रसिद्ध चितारी याला आणलें होतें.

या शनवार वाड्यांतील सर्वांत मुख्य दिवाणखाना गणपती—रंगमहाल हा होय. या महालांतच अत्यंत महत्त्वाचे समारंभ, व दरबार होत असत. हा महाल श्रीमंत बाळाजी बाजीराव उर्फ नाना साहेब पेशवे यांनीं खास गणपती उत्सवासाठीं इ० स० १७५५ त बांधला. या महालांत एका भिंतींत सुंदर मखर तयार केलें होतें व त्यांत सुंदर संगमरवरी दगडाची श्री गणपतीची मूर्ती स्थापिलेली होती. तिच्या आजू बाजूला पौराणिक कथाप्रसंग काढलेले होते. या महालाच्या दुसऱ्या टोंकाला थुइथुइ उडणारीं सुंदर कारंजीं होतीं, व त्याच्या पलिकडे सुवासिक फुलझाडांचा एक सुंदर बाग होता. तेथील कारंजांचा मनोहर ध्वनी व फुलांचा आनंददायक वास तेथें क्षणभर उभे रहाणाराचें मन अगदीं प्रसन्न करीत असे.

या महालांत दर वर्षी भाद्रपद महिन्यांत गणेशचतुर्थीपासून अनंतचतुर्दशी पर्यंत दहा दिवस मोठ्या थाटानें गणपतीचा उत्सव साजरा करण्यांत येत असे. त्याचप्रमाणें आश्विन महिन्यांत विजयादशमीचे दिवशीं म्हणजे दसऱ्याचे दिवशीं फारच मोठा व थाटाचा दरबार याच महालांत भरत असे. त्या दिवशीं मराठी साम्राज्याचे सर्व सरदार, दरकदार, मानकरी, संस्थानिक वगैरे हजर असत. निरनिराळया युद्धांत यश मिळाल्यावर याच महालांत मोठे विजयोत्सव होत असत. याच महालांत बसून थोरले माधवराव यांनीं आपली यशस्वी मुत्सद्देगिरी चालविली, व याच महालाचे जवळच्या खोलींत श्रीमंत नारायणरावसाहेब पेशवे यांचा सुमेरसिंग गारदी यानें क्रूरपणानें वध केला. याच महालांत वैभवशाली श्रीमंत सवाई माधवराव मोठ्या आनंदानें सर्व प्रजेला आनंदवीत जवळ जवळ वीस वर्षे राहिले. श्रीमंत सवाई माधवरावांचे लग्नाचा अत्यंत थाटाचा समारंभ याच महालांत इ० स० १७८२ त झाला त्या समारंभाला हैदराबादचे निजाम, नागपूरचे श्रीमंत राजे भोंसले, सातारचे राजे, व दुसरे पुष्कळ

संस्थानीक व सरदार सर्व हिंदुस्तानांतून आले होते. मराठ्यांचा वैभवसूर्य सन १७९५ त अत्यंत देदीप्यमान झाला. त्याच सालीं मराठ्यांनीं खडर्याची लढाई जिंकली व निजामाचा पराभव केला. त्यावेळीं त्या विजयोत्सवानंतर अत्यंत थाटानें श्रीमंत सवाई माधवराव पेशवे यांनीं सर्व लष्करासह थाटानें पुण्यनगरांत प्रवेश केला. हाच मराठ्यांचा शेवटचा आनंदाचा व उत्सवाचा प्रसंग. या आनंदाच्या गिरीवरून लवकरच शोकसागरांत सर्व प्रजा निमग्न झाली. कारण वर सांगितलेल्या गणेश महालांतून श्रीमंत सवाई माधवराव खालीं कारंजावर पडले व अगदीं कोमल वयांत म्हणजे २३ वे वर्षी मृत्यु पावले. त्यांच्या बरोबरच मराठी साम्राज्याचा भाग्यरवि अस्तास गेला. याच महालांत परराष्ट्रांचे वकीलांची पेशवे भेट घेत असत. इंग्लीश ईस्ट इंडिआ कंपनीचे मुंबई कौन्सिलाचे सभासद टॉमस बेफाल्ड व जॉन स्पेन्सर यांस याच महालांत श्रीमंत नाना साहेब पेशवे यांनीं इ० स० १७५६ त भेट दिली, व त्यांना १२२४ रुपयांचा पोषाख दिला. या शिवाय इंग्लीश वकील मायस्टीन, कर्नल अप्तन व दुसरे बरेच इंग्रज, व फ्रेंच वकील बुसी व सेंट लुबिन यांसही याच महालांत पेशव्यांनीं भेट दिली. याच महालांत सर चार्लस मॅलेट व दुसरे पुण्याचे इंग्रज रेसिडेंट पेशव्यांस भेटत असत.

या व इतर महालांसभोंवतीं सुंदर बागा केलेल्या होत्या व त्यांत सुंदर कारंजीं बांधलेलीं होतीं. तीं मोठमोठ्या प्रसंगीं थुइथुई उडत असत. श्रीमंत सवाई माधवराव यांस बाग व कारंजीं फार आवडत असत. खास त्यांच्या मनोरंजनासाठीं एक ‘ हजारी कारंजें ’ या नांवाचें फार मोठें व सुंदर कारंजें तयार केलें होतें. तें वाड्याच्या पश्चिम भागीं होतें. तें सोळा पाकळ्यांच्या कमळाच्या आकाराचें होतें. प्रत्येक कमळ पाकळींत सोळा तोट्या होत्या. एवढें मोठें कारंजें साऱ्या जगांत फक्त एका रोम शहरीं मात्र आहे हें कारंजें उडूं लागलें म्हणजे त्याच्या शेंकडों धारांवरून सूर्याचे किरणांचें परावर्तन होऊन अनेक मनोहर इंद्रधनुष्यें बनत व पुनः मोडून जात, असा सुंदर देखावा प्रेक्षकांचे नजरेस पडे व सर्व प्रेक्षक आनंदानें अगदीं तल्लीन होऊन

जात. पश्चिमेच्या बाजूस एक खोल हौद होता. त्यांत पाण्याचे कृत्रिम धबधबे बनविले होते. चांदण्या रात्रीं आपल्या इष्टमित्रांना व प्रिय सरदारांना ही शोभा पहाण्यासाठीं श्रीमंत सवाई माधवराव बोलावीत असत व त्यांचे बरोबर हें जलसौंदर्य पहात तासचे तास मनोरंजन करीत असत.

या वाड्यांतील एका दालनांत पेशव्यांचा पुस्तकसंग्रह होता. त्यांत संस्कृत वगैरे भाषेंतील अमोलिक व दुर्मिळ अशा पुस्तकांचा संग्रह व्यवस्थित रीतीनें ठेवलेला होता. एक चित्रशाळा होती, तिच्यांत अतीशय नामांकित चित्रकारांनीं काढलेलीं चित्रें होतीं. त्यांत कांहीं मोंगल बादशहांचीं व कांहीं मार्किस ऑफ वेल्सली व अशाच दुसऱ्या सुप्रसिद्ध इंग्रजांचींही होतीं. एक जिन्नसखाना उर्फ अजबखाना या नांवाचा महाल होता. त्यांत अत्यंत दुर्मिळ व मोठ्या परिश्रमानें गोळा केलेल्या फार दूर देशाहून आणलेल्या वस्तूंचा संग्रह केलेला होता. त्या दालनांत एक पृथ्वीचा गोल होता. त्या गोलावर ( ग्लोबावर ) लाटिन भाषेंत निरनिराळ्या शहरांचीं नद्यांचीं वगैरे नावें लिहीलेलीं होतीं. त्याचप्रमाणें एक मोठी दुर्बीणही तेथें होती. शनवार वाड्यांत एक सुंदर व मोठें घड्याळही भिंतीवर लावलेलें होतें, तें पेशवाईत जसें चालू होतें, तसेंच पेशवाई बुडाल्यावरही सन १८२७ च्या जानेवारीच्या २७ तारखेपर्यंत म्हणजे अग्नीनें त्याचें भस्म होईपर्यंत बरोबर चालत होतें.

इ० स० १८१८ पर्यंत हा वाडा वैभवपूर्ण होता तोंच पेशवाई बुडून इंग्रजाचे हातीं पडतांच जखमी सोजिरांचें हास्पिटल बनला. त्या तशाही दुर्दैवाच्या फेऱ्यांत त्या बिचाऱ्यानें जवळ जवळ दहा वर्षें काढलीं. पण तो धाकट्या बाजीरावा इतका निगरगट्ट नव्हता म्हणून त्यानें आपल्या दुर्दैवाला कंटाळून इ० स० १८२७ त अग्निकुंडांत आपलें भस्म करून टाकलें. पण बाजीराव कसले वस्ताद, ते खुशाल तसल्या दुर्दैवाच्या व अपमानास्पद स्थितींतही मोठ्या आनंदानें इ० स० १८५१ पर्यंत ब्रम्हावर्तीत मजेनें राहिले. झालें शनवार वाड्याच्या जन्माचें, त्याच्या वैभवाचें व त्याच्या अग्निप्रवेशाचें वर्णन झालें. काय काळाचा प्रभाव सांगा-

वा. एकदां जी जागा कोळयांच्या झापड्यांनीं आक्रमिली होती, तिचेंच नशीब उदयास येतांच ती सर्व हिंदुस्तानचें केंद्रस्थान, वैभवशाली पेशव्यांचें निवासस्थान बनली. पण पुन: दुर्दैवाचा फेरा येतांच जखमी शिपायांचें हॉस्पिटल बनली. नंतर तेथेंच दिवाणी कोर्ट आलीं, व आतां सर जॉर्ज लाइड यांच्या कळकळीनें व प्रिन्स ऑफ वेल्सच्या हस्त स्पर्शानें ती पुन: एकदां मराठ्यांच्या वैभवाचें स्मारक होऊन राहिली आहे.

( २ ) **अमृतेश्वराचें देऊळ:**—हें देऊळ श्री शंकराचें आहे. हें मुठा नदीचे तीरीं बांधलेलें आहे. हें श्रीमंत थोरले बाजीराव यांची बहीण आणि अंबाजीपंत बारामतीकर यांची पत्नी श्री. सौ. भिऊबाई यांनीं आपल्या खर्चानें बांधलें. याचें बांधकाम मजबूत व सुबक आहे. याला पर्वती संस्थाना कडून दरमहा १५ रुपये मिळतात.

( ३ ) **पांजरापोळ:**—हा व्यापारी मंडळीनें इ० स० १८५४ सालीं बांधला. येथें लुळीं पांगळीं व निराश्रित जनावरें, पक्षी वगैरे ममतेनें संभाळण्यांत येतात. शहराजवळ येथील जनावरांस चरण्यासाठीं दोन कुरणें आहेत.



# बुधवार पेठ.

बुधवार पेठ हें कांहीं या पेठेचें मूळचें नांव नाहीं. हिला मुसलमानी अमलांत मोहिनाबाद असें नांव होतें. ही पेठ प्रथम दिल्लीचा बादशहा औरंगझेब यानें इ० स० १६९० त वसविली. या पेठेचें क्षेत्रफळ आजमासे १८५००० चौरस यार्ड आहे. ही पेठ पुणें शहरच्या अगदीं मध्यावर आहे. या पेठेचें पुनरुज्जीवन थोरले माधवरावांचे कारकीर्दींत (१७६१–१७७२) गोविंद शिवराम खासगीवाले यांनीं केलें. सर्व शहरांत ही पेठ अतीशय दाट वस्तीची आहे. या पेठेंतील बहुतेक रस्त्यांच्या दोनही बाजूंच्या घरांत दुकानें खच्चून भरलेली आहेत. बुधवार चौकांत संध्याकाळच्या वेळीं मुंग्या सारखीं माणसें वावरत असतात. त्यांतच टांगे, सायकली व नवीनच झालेल्या मोटारी यांचा धुमाकुळ माजलेला असतो. यामुळें फारच गम्मत दिसते. सर्व बुकसेलरांचीं दुकानें या बुधवार चौकांत आहेत. इतकी पुस्तकांची विक्री होत असल्यामुळें साहजीकच लोकांचे डोळे अधु होणार म्हणून बुकसेलरांचे शेजारीं चष्मेवाल्यांनींही आपलीं दुकानें मुद्दाम लोकसेवेसाठीं उघडलीं आहेत. याशिवाय पुढें गंध्यांचीं, कापडवाल्यांचीं, माळ्यांचीं, शिंप्यांचीं, फुलमाळ्यांचीं दुकानें खच्चून भरलीं आहेत. त्यांतच लिहिणारे लोक विद्यार्थी यांचे सोईसाठीं स्टेशनरी दुकानें व कांच कामाचीं दुकानें तळ देऊन बसलीं आहेत. बुधवार चौकांत अगदीं कोपऱ्यावर धाकटे उर्फ पळपुटे बाजीराव यांनीं शहरची मौज पहावयास सांपडावी म्हणून स्वतः साठीं एक वाडा बांधला होता. त्याला बुधवार वाडा म्हणत. या पेठेंत पहाण्याचीं ठिकाणें म्हटलीं तर (१) नाना फडणीस यांचा वाडा, (२) किर्लोस्कर नाटकगृह, (३) आनंदोद्भव नाटकगृह, (४) बुधवार बाग,

( ५ ) तांबडी जोगेश्वरी, ( ६ ) मोरोबा दादांचा वाडा, ( ७ ) कोत-वाल चावडी, ( ८ ) बेलबाग, ( ९ ) आनंदाश्रम, ( १० ) जान स्मॉल मेमोरियल हाल, ( ११ ) हुजूर पाग ( १२ ) नूतन आर्यभूषण थिएटर.

( १ ) **नाना वाडा उर्फ फडणीसांचा वाडाः**—हा वाडा पेशवाईतील सुप्रसिद्ध मुत्सद्दी नाना फडणीस यांनीं पेशव्यांच्या जवळ राहून यांची एकनिष्ठपणें सेवा करतां यावी म्हणून पेशव्यांच्या शन-वार वाड्याच्या अगदीं शेजारीं बांधला. पेशवाई बुडाल्यावर इतर ऐति-हासिक इमारतीप्रमाणें हा वाडा इंग्रज सरकारचे ताब्यांत आला. पुढें इंग्रजसरकारनें तो डेकन एज्युकेशन सोसायटीला न्यू इंग्लिश स्कूल साठीं दिला. पुढें तो वाडा अगदीं मोडकळीस आला होता, यामुळें डेकन एज्यु-केशन सोसायटीनें पुष्कळ खर्च करून त्या वाड्याच्या जागीं अतीशय सुंदर व भव्य इमारत न्यू इंग्लिश स्कूल साठीं बांधली. जुनी इमारत पाडावी लागली, तरी पण नानाचें पुण्यस्मरण नेहमीं व्हावें म्हणून ते बसत असत तो दिवाणखाना दुरुस्ती करून कायम ठेवला आहे व सर्व नव्या इमारतीला ' नानावाडा ' असें नानांचें स्मरण करून देणारें सुबक नांव ठेवण्यांत आलें आहे.

( २ ) **किर्लोस्कर नाटक गृहः**—पुण्यांत भरमध्यवस्तींत सर्वांस जाण्यास सोईचें, नाटक कंपन्यांस प्रयोगास उत्तम असें नाटकगृह नव्हतें. ही उणीव भरून काढावी म्हणून प्रसिद्ध नाट्याचार्य आण्णासाहेब किर्लो-स्कर यांच्या कंपनीचे कर्तबगार मॅनेजर शंकरराव मुजुमदार यांनीं लाख-दोनलाख रुपये खर्च करून हें नाटकगृह बांधलें. यामुळें मोठमोठ्याही नाटक मंडळयांची व रासिक प्रेक्षकजनांचीही उत्तम सोय झाली. त्याचप्रमाणें राज-कीय सामाजिक, धार्मिक वगैरे चळवळींच्या सभा भरविण्यास पूर्वीं सोईची जागा नव्हती तीही उणीव या नूतन थिएटरानें भरून काढली आहे. अली-कडे बहुतेक प्रचंड सभा एकतर शिवाजी मंदिराच्या उघड्या पटांगणांत किंवा या किर्लोस्कर थिएटरांत भरतात. हें थिएटर मोठें आहे, यामुळें यांत

थाटांची, टामडौलाची, नटण्याथटण्याची किंवा आपल्या वैभव प्रदर्शनाची हौस आमच्या महिलाजनांना अधिक. हल्लीं सर्व युरोपखंडाला पुढारी पणानें नवीन फॅशन लावून देण्याचें काम फ्रान्स देशांतील पॅरिस नगरींतील युवती करीत असतात. अगदीं नव्यांत नवी फॅशन किंवा टूम कोणती हें पहावयाचें असल्यास पॅरिसला जावें व तेथील युवतींचा नयनमनोहर पोषाख पहावा म्हणजे झालें. आमच्या इकडे पुणें शहर हें आमच्या महाराष्ट्राचें पॅरिसनगर आहे. पोषाखांत किंवा डागडागिन्यांत नवीन फॅशन अथवा टूम पुण्यनगरीच्या हौशी महिला प्रथम घालून देतात. त्याचें प्रदर्शन प्रथम वैशाखमासीं या कसब्याच्या गणपतीला अक्षत देण्यासाठीं काढलेल्या मिरवणुकींत करण्यांत येतें. सर्व महाराष्ट्रांतील महिला पुण्यास वैशाखांत होणाऱ्या हजारों लग्नांसाठीं सहज आलेल्या असतातच. त्या मग परत जातांना ही नवीन फॅशन पाहून आपापल्या गांवीं जातात व तेथें या फॅशनचा फैलाव आपल्या भगिनींमध्यें करतात अशा तऱ्हेनें हं हं म्हणतां पुण्यास सुरू झालेली फॅशन उर्फ टूम सर्व महाराष्ट्रभर पसरते. अशा रीतीनें आज किती तरी वर्षें सर्व महाराष्ट्रमहिलांवर पुण्यनगरीच्या तरुण स्त्रिया राज्य करीत होत्या. पण अलीकडे हा आपला अधिकार आपखुशीनें त्यांनीं नाट्यकुशल बालगंधर्वांना देऊन टाकला आहे. बालगंधर्व प्रथम आपल्या नव्या फॅशनचें प्रदर्शन किर्लोस्कर थिएटरमध्यें करतात. मग तेथें जमलेल्या शेंकडों रसिक व गुणग्राहक युवती डोळे भरून तें प्रदर्शन पाहतात व लगेच आपल्या केशरचनेंत, पोषाखांत, व दागिन्यांत बालगंधर्वांची ती नवीन फॅशन आणून सोडतात. आजकाल बालगंधर्व हे सकल महाराष्ट्र महिलांवर फॅशनच्याबाबतींत राज्य करीत आहेत. सोनार देखील नथ गुंफावयास सांगितल्यास गंधर्व फॅशनची पाहिजे का साधी पाहिजे असें आधीं विचारतात. असो लग्न मुंजीच्या हंगामांत कसब्यांतील गणपतीचें देऊळ शेंकडों अक्षतांनीं अगदीं गजबजून जातें. अशा या लोकमान्य देवळाला पर्वती संस्थानांतून फक्त ५ रुपये महिना मिळतात. या देवालयांतील गणेश चतुर्थीच्या उत्सवाचा खर्चही पर्वतीच्या संस्थानाकडूनच होतो.

सन १८७९ सालीं आग लागली व वाड्याचा बहुतेक भाग अग्नीच्या भक्षस्थानीं पडला, फक्त फरासखाना नांवाचा मागचा दुमजली भाग बचावला. या जागीं पेशव्यांचे नोकर चाकर रहात, व बिछायतीचें सामान ठेवीत. या फरासखान्यांत आतां पोलीस स्टेशन व पोलीस कचेरी आहे.

( ५ ) **तांबडी जोगेश्वरीः**—कसब्यांतील गणपतीप्रमाणेंच तांबडी जोगेश्वरी ही पुणें शहरची अतिशय प्राचीन देवता आहे. जोगेश्वरीचें देऊळ इ० सनाच्या सहा किंवा सातव्या शतकापासून अस्तित्वांत आहे. प्रत्येक मंगल प्रसंगीं या देवीला अक्षत देऊन आमंत्रण करावें लागतें. ज्याप्रमाणें मार्गशीर्ष, माघ, फाल्गुन, चैत्र, वैशाख व ज्येष्ठ या महिन्यांत लग्न मुंजींच्या अक्षती शेंकडो नटलेल्या स्त्रीपुरुषांच्या बँड—चौघडा—ताशे-युक्त मिरवणुकींची मारे धुमश्चक्री श्रीमन्महा गणपति मु० कसबा पेठ यांचे मंदिराकडे चालली असते, त्याचप्रमाणें या जोगेश्वरीच्या देवळाजवळही लग्नमुंजींच्या हंगामांत धूमधडाका चालू असतो. ज्याप्रमाणें हल्लीं सर्वांत नवीन टूम कोणती आहे हें क्षणभर कसब्याच्या गणपति-जवळ उभें राहिल्यानें समजतें त्याचप्रमाणें तें तांबड्या जोगेश्वरी जवळ उभें राहूनही लक्ष्यांत येतें. या देवीला तांबडी जोगेश्वरी म्हणण्याचें कारण हिला नेहमी शेंदूर लावल्यामुळें ही तांबडी दिसते हें होय. अश्विन महिन्यांत नवरात्राचे ९ दिवस येथें मोठा उत्सव होतो.

( ६ ) **मोरोबा दादांचा वाडाः**—हा सुप्रसिद्ध ऐतिहासिक वाडा सुप्रसिद्ध नानाफडणीस यांचे चुलत बंधु मोरोबादादा फडणीस यांनीं बांधला. हा वाडा फारच मोठा, व फार मजबूत आहे. या वाड्यांतील लांकडावरचें खोदकाम अप्रतिम आहे. या सर्व वाड्यावर गच्ची आहे. या वाड्याच्या तिसऱ्या मजल्यावर एक आरसे महाल आहे. या वाड्याला नऊ लक्ष रुपये खर्च आला असें म्हणतात.

( ७ ) **कोतवाल चावडीः**—पेशव्यांच्या वेळीं या दुमजली इमारतींत पोलीस कचेरी होती. तळमजल्यावर तुरुंग होता, व वरचे मजल्यावर कोतवाल साहेबांची कचेरी होती. सुप्रसिद्ध घाशीराम कोतवाल

त्याच ठिकाणीं माडीवर खटल्यांची चौकशी करीत असे. हल्लीं या इमारतींत खालचे मजल्यावर माळ्यांचीं हार तुऱ्यांचीं दुकानें व एक चहा कॉफीचें दुकान आहे व वरच्या मजल्यावर दैव पहाणारे ज्योतिषी बुवांचें ऑफीस आहे. खालील मजल्यावर हलवायांचीं पेढा बर्फी बत्ताशांचीं दुकानें आहेत. ह्या इमारतीस कोतवाल चावडी असें नांव पडण्याचें कारण या इमारतींत पेशवाईत कोतवाल या अधिकाऱ्याचें ऑफीस असे. कोतवालाचा म्हणजे मुख्य शहर पोलीस अम्मलदाराचा हुद्दा प्रथम श्रीमंत थोरले माधवराव यांनीं निर्माण केला. पूर्वी पुणें शहर लहान असल्यामुळें पुष्कळ पोलीस शिपाई व अधिकारी यांची तेथें जरूर नसे. पण पुढें पुणें सर्व हिंदुस्तानाला व्यापणाऱ्या वैभवशाली व पराक्रमी मराठी साम्राज्याचें केंद्रस्थान बनलें. यामुळें येथली वस्ती भराभर वाढली व हें संपत्तीचें व ऐश्वर्याचें माहेरघर बनलें. ही गोष्ट श्रीमंत थोरले माधवराव साहेब पेशवे यांच्या ध्यानांत आली व त्यांनीं पुण्याचें एक स्वतंत्र पोलीस खातें बनविलें व त्या खात्यावर एक बडा कोतवाल नांवाचा अधिकारी नेमला. पुण्याचा पहिला कोतवाल बाळाजी नारायण केतकर हा झाला. त्याची नेमणूक इ० स० १७६४ त झाली. पोलिस सुपरिंटेंडेंटचा त्याच्यावर अम्मल चालत नसे. त्याच्या हाता खालीं शिबंदी व घोडेस्वार अशा दोन प्रकारचे लोक असत. शहरांत ठिकठिकाणीं पोलीस चौक्या ठेवल्या होत्या, आणि घोडेस्वार रात्रभर रस्त्यांतून पहारा करीत असत. रात्रीं ११ वाजतां तोफ वाजत असे. ती झाल्यावर रस्त्यानें कोणालाही भटकण्याची परवानगी नसे. पहाटेस पुनः ४ वाजतां तोफ होई, व मग वाटेल त्याला रस्त्यानें हिंडण्या फिरण्याची मोकळीक होई.

**कोतवालाचें काम** हल्लींच्या पोलीस सुपरिंटेंडेंटपेक्षां निराळ्या प्रकारचें असें. कोतवालाला शहराच्या व नागरिकांच्या संरक्षणाशिवाय दुसरेंही बरेंच काम असें. किरकोळ तंट्याचा इन्साफ करण्याचा व बारीक सारीक तक्रारी ऐकून दाद देण्याचा त्याला अधिकार दिलेला होता. बाजारांवर त्यांला देखरेख करावी लागे, व वजनें मापें तपासावीं लागत. गवई,

रोडा, न्हावी वगैरेवर त्याचा अम्मल चालत असे. याशिवाय शहरच्या आरोग्याची व्यवस्था त्याचेकडे असे. त्याचप्रमाणें सार्वजनिक सडका, इमारती, गटारें यांच्या दुरुस्तीचें कामही त्याच्याकडेच असे. सरकारी बडे पाहुणे यांची व्यवस्था त्यालाच पहावी लागे, व सार्वजनिक धर्मादायाची व्यवस्था व दस्तऐवज नोंदण्याचें काम त्याच्याकडेच असे. याशिवाय गुन्ह्यांचा तपासही त्यालाच करावा लागे. म्हणजे हल्लींची म्युनिसिपालिटी, डिटेक्टिव खातें, मॅजिस्ट्रेट, एंजीनियरखातें, रेजिस्ट्रेशनखातें हीं सर्व खातीं कोतवालांत एकवटलीं होतीं. इतकेंही असून सन १७६४ त कोतवालाचे हाताखालीं सारे पांच कारकून व अठरा शिपाईच होते, आणि त्या सर्वांचा वार्षिक खर्च फक्त १४७९ रुपये होता. सन १७६८ त दुसरा कोतवाल नेमला त्याचें नांव जनार्दन हरी. याचे वेळीं कारकून व शिपाई बरेच वाढविले, यामुळें खर्चही ३६१८ रुपये होऊं लागला. पुढें आणखी अधिक अम्मलदार कोतवालांचे हाताखालीं नेमले यामुळें पुढें सालाचा खर्च रु. ५२९५ होऊं लागला. कोतवाल नेमावयाचा तो अतिशय हुशार व लायख असा इसम पाहूनच त्याला नेमीत असत. सर्व कोतवालांत घाशी-राम कोतवालाचें नांव इतिहासांत फार प्रसिद्ध आहे. तो कनोजी ब्राह्मण होता. त्याच्या बापाचें नांव सामळदास. तो मूळचा औरंगाबादचा रहा-णारा. नोकरी करून किंवा व्यापार करून श्रीमंत व्हावें, म्हणून तो पुण्यास आला होता. तो दिसण्यांत सुरेख व तरतरीत होता यामुळें लवकरच मुख्य प्रधान नानाफडणीस यांची त्याचेवर मर्जी बसली. यामुळें घाशीरामाची भराभर बढती होऊन त्याला इ० स० १७८२ त पुणे शहरची कोतवाली मिळाली. तो आपलें काम मोठ्या दक्षतेनें व हुशारीनें करी. त्याचे आधीं इ० स० १७७७ त आनंदराव काशी हा कोतवाल होता. त्याला काढून १७७७ त त्याजागीं घाशीरामाची तात्पुरती नेमणूक केली व त्याला त्याजागीं इ० स० १७८२ त कायम केलं. इ० स० १७८२ पासून पुढें पुणें शहरांत व्यभिचारासंबंधीं गुन्ह्यांचें प्रमाण फारच वाढलें होतें यामुळें घाशीरामाचें चांगलेंच फावलें. आपल्याला नानाफडणीसांचें पाठबळ आहे

हें त्याला ठाऊक होतें. यामुळें तो लोकांवर फार जुलूम करूं लागला व पैसे खाऊं लागला, यामुळें लोक अतिशय त्रासून गेले. सरते शेवटीं लोकांच्या संतापाचा परिणाम घाशीरामाला भोगावा लागला तो असाः--सन १७९१ च्या आगस्ट महिन्याचे अखेरीस एके दिवशीं रात्रीची ११ ची तोफ वाजल्यानंतर ३४ तेलंगी ब्राह्मण रस्त्यांत भटकत होते. कोणीही रात्रीची तोफ झाल्यानंतर रस्त्यावर भटकत रहातां कामा नये असा पेशवाईत कायदा होता. तो या ३४ तेलंगी ब्राह्मणांनीं मोडला यामुळें घाशीराम कोतवालच्या हाताखालच्या पोलीस शिपायांनीं कायद्याप्रमाणें त्या चौतीस तेलंगीं ब्राह्मणांना कोठडींत कोंडून ठेवलें. दुसरे दिवशीं सकाळीं कोठडी उघडली तेव्हां त्या ३४ जणांपैकीं २३ जण मेलेले आढळले व बाकीचे देखील मरणाच्या पंथास लागले होते. घाशीरामाला सकाळपर्यंत या गोष्टीची माहिती नव्हती असें दिसतें. त्याच्या हाताखालच्या लोकांनीं नेहमींच्या वहिवाटीप्रमाणें वरील गोष्ट घाशीरामाला न विचारतां केली होती. तरी देखील या भयंकर प्रकारच्या दोषाचें खापर लोकांनीं घाशीरामाच्या कपाळावर फोडलें; कारण तो अतिशय अप्रिय झाला होता. होतां होतां त्याच्या विरुद्ध इतका गवगवा झाला कीं त्याला आपला जीव घेऊन शनिवारवाड्यांत जाऊन लपावें लागलें. पण तेलंगी ब्राह्मणांचा चवताळलेला घोळका तेथेंही त्याच्या पाठोपाठ गेला. त्यांनीं त्याला शनवार वाड्यांतून फराफरा ओढून बाहेर आणलें, व एका भंग्याच्या स्वाधीन केलें. मग त्यांच्या सांगण्यावरून त्या भंग्यानें त्याचे हातपाय बांधले व त्याच्या कमरेला एक दोर बांधला. नंतर तो भंगी त्या दोरानें घाशीरामाला रस्त्यांतून फराफरा ओढीत चालला. त्याच्या पाठोपाठ तेलंगी वगैरे लोकांची गर्दी, कोणी त्याला लाथा मारीत, कोणी शिव्या देत, व कोणी दगड मारीत अशी चालली होती. अशा तऱ्हेनें रस्त्यारस्त्यानें ओढीत ओढीत त्या बिचाऱ्याला भवानी पेठेंतून नवापुऱ्यांत नेलें, व तेथें त्यानें स्वतः त्या काळांत बांधलेल्या सुंदर देवळासमोर त्या चवताळलेल्या लोकांनीं त्याला लाथा बुक्यांनीं व दगडमार करून ठार मारिलें.

अशा वाईट रीतीनें जरी लोकांनीं त्याला ठार मारिलें तरी ही गोष्ट कबूल करणें भाग आहे कीं एकंदरींत त्यानें पुणें शहराची व्यवस्था चोख ठेवली होती. पोलीस अम्मलही नीट ठेवला होता. त्यानें भवानी पेठेच्या पूर्वेस नत्रापुरा या नांवानें प्रसिद्ध असलेली पेठ वसाविली, आणि प्रवाश्यांना उपयोगीं पडावा म्हणून हडपसरच्या रस्त्यावर एक तळाव, आणि एक बाग केला. घाशीरामाच्या मरणानंतर ( ३१ आगस्ट १७९१ ) आनंदराव काशी याला सन १७९१ पासून पुनः पुणें शहरचा कोतवाल नेमिलें. तो १७९६ पर्यंत त्या हुद्यावर होता. त्यावर्षीं पळपुटे दिवटे बाजीराव पेशवे झाले. त्यांनीं इतर गोष्टीप्रमाणें या जागेसंबंधींही आपला मूर्खपणा प्रगट केला. त्यांनीं कोतवालीची जागा लिलावानें दिली. विठोबा नाईक गायकवाड या नांवाच्या इसमानें सन १८०० मध्यें रु. ११२००० रुपयांला सरकारांतून ती जागा विकत घेतली. यावरून कोतवालाला लोकांपासून किती प्राप्ती होत असेल याची कल्पना सहज करतां येते. सन १८१०–११ सालीं पुणें शहरच्या बंदोबस्तासाठीं कोतवालाच्या हाताखालीं एकंदर १६२८ नोकर होते. त्यांपैकीं ५५८ शहरांतील निरनिराळ्या चौक्यांवर ठेवले होते, १६७ रस्त्यांत रात्रीं गस्त घालण्यासाठीं ठेवले होते व बाकीचे सरकार वाड्यांत व इतर कामावर होते. पळपुट्या बाजीरावाच्या कारकीर्दींत पुण्याच्या एकंदर १८ पेठा होत्या. त्यावेळीं पोलीसची व्यवस्था चांगली होती व मोठासा गुन्हा बहुतकरून क्वचितच होत असे. असो, सन १७६८ सालीं बांधलेली जी कोतवाल चावडी तिच्या कोतवालाची अशी ही हकीकत आहे.

( ८ ) **बेलबागः**—येथें बेलाचीं झाडें पुष्कळ होतीं म्हणून या जागेला बेलबाग असें नांव पडलें. या जागीं पूर्वीं पेशव्याचे तबेले होते. नंतर या जागीं नानाफडणीस यांनीं सुंदर विष्णूचें देऊळ बांधलें. या देवळाला पुणें सातारा व अहमदनगर या जिल्ह्यांतील चार गांवें इनाम म्हणून नानाफडणीसांनीं पेशव्यांकडून संपादन केलीं होतीं. पण धाकटे विचित्र रावबाजी यांनीं या विष्णु मंदिरांचाही गांवें जप्त केलीं. धाकटे बाजीराव

पेशवाई गमावून ब्रह्मावर्तास हरी हरी करीत बसल्यावर नानाफडणीसांची बायको जिऊताई हिच्या विनंतीला मान देऊन मि. एलफिन्स्टन यांनीं तीं गांवें जिऊबाईला परत दिलीं. ह्या देवळाची व्यवस्था नानाफडणीसांचे वंशजांकडेच आज तागायत आहे. या देवळांत श्री विष्णूची एक सुंदर मूर्ति आहे. तिच्या समोर कथा कीर्तनें वगैरेंना सोईचा असा भव्य सभा-मंडप आहे. श्री विष्णूच्या समोर हात जोडून गरूड उभा आहे. श्री विष्णूच्या देवळाच्या एका बाजूला लहानसें शिवमंदीर, व दुसऱ्या बाजूला लहानसें गणेश मंदीर आहे. या देवळाच्या आवारांतच पुजारी व व्यवस्था-पकांना रहाण्यासाठीं घरें बांधलेलीं आहेत. एकंदरींत देवळाची व्यवस्था उत्तम ठेवलेली आहे. दर एकादशीला नवीन नवीन हरदासांची कथा या देवळांत होत असते. त्या दिवशीं शेंकडों भाविक स्त्रिया व बरेच पुरुष या देवळांत दर्शनास व कीर्तन श्रवणास जातात.

**( ९ ) आनंदाश्रमः**—सुप्रसिद्ध कादंबरींकार कै० हरी नारायण आपटे यांचे चुलते कै० महादेव चिमणाजी आपटे हे मुंबईतील पहिल्या प्रतीचे हायकोर्ट वकील होते. त्यांनीं लाखो रुपये मिळविले व शेवटीं पुण्यास आनंदाश्रम या नांवाची सुंदर इमारत व त्या इमारतींत आपली समाधीची जागा बांधली. मरणाचे आधीं संन्यास घ्यावयाचा व मरणा-नंतर या इमारतींत आपणास पुरून त्यावर समाधी बांधावयाची अशी त्यांची इच्छा होती. त्याप्रमाणें त्यांनीं व्यवस्था करून ठेवली होती, व त्यांच्या मरणानंतर त्यांच्या इच्छेप्रमाणें त्यांचे पुतणे कै० हरी नारायण आपटे यांनीं सर्व व्यवस्था केली. कै० महादेव चिमणाजी आपटे यांनीं या संस्थेस आपली सर्व जिंदगी दिली आहे. तिच्या उत्पन्नांतून त्यांच्या आज्ञेप्रमाणें उत्तम जुने असे संस्कृत ग्रंथ नेमलेल्या शास्त्री मंडळी कडून नीट संपादीत होऊन प्रसिद्ध होत असतात. प्राचीन संस्कृत ग्रंथाचें व प्राचीन ऋषींचें ज्ञानभांडार ज्याला पहावयाचें असेल त्यानें हा आनंदा-श्रम अवश्य पहावा.

(१०) **जॉन स्मॉल मेमोरिअल हॉलः**—ही इमारत आनंदाश्रमाजवळ आहे. ही फ्रीचर्च ऑफ़ स्कॉटलंडमिशननें बांधली आहे. ही दगडी भक्कम व दुमजली आहे. या इमारतींत मोफत वाचनालय आहे. त्यामध्यें इंग्रजी मासिकें व इंग्रजी व मराठी वर्तमान पत्रें फक्त वाचण्यासाठीं ठेवलेलीं असतात. त्याचप्रमाणें निवडक किंमतवान इंग्रजी पुस्तकेंही येथें वाचण्यासाठीं ठवलेलीं असतात. वरच्या मजल्यावर एक सुंदर दिवाणखाना आहे तो व्याख्यानांच्या फार उपयोगीं आहे. या दिवाणखान्यांत ख्रिस्ति मिशनरींचीं किंवा त्यांनीं बोलावलेल्या उत्तम वक्त्यांचीं व्याख्यानें निरनिराळ्या विषयांवर होत असतात. मोफतवाचनालय रविवार शिवाय रोज सकाळीं ७–१०, व संध्याकाळीं ४–६ पर्यंत खुलें असतें.

(११) **हुजुरपागः**—हुजुर म्हणजे सरकार, व पाग म्हणजे घोड्यांचा तबेला. या ठिकाणाला हुजुरपाग असें म्हणण्याचें कारण येथें पूर्वीं पेशवे सरकार यांचे घोडे ठेवीत असत. या ठिकाणीं हल्लीं हिंदी स्त्रियांसाठीं हायस्कूल आहे. हें हायस्कूल न्यायमूर्ति माधवराव रानडे, रा. शंकर पांडुरंग पंडित वगैरे स्त्री शिक्षणाविषयीं कळकळ बाळगणाऱ्या थोर विद्वान गृहस्थांनीं मोठ्या खटपटीनें स्थापिलें, व त्याची व्यवस्था पहाण्यासाठीं एक कमिटी बनविली. या ठिकाणीं मॅट्रिक पर्यंतचें शिक्षण मुलींना देण्यांत येतें. या शाळेला जोडून होस्टेल म्हणजे भोजन वसतिगृह आहे यामुळें परगांवच्या लोकांस येथें आपल्या मुली इंग्रजीं शिक्षणासाठीं ठेवतां येतात. या शाळेची व तिला जोडलेल्या वसतिगृहाची व्यवस्था अतिशय उत्तम आहे. येथें शिक्षण उत्तम तऱ्हेनें देण्यांत येतें. शाळेसभोंवतीं सुंदर बाग व विस्तृत पटांगण आहे, यामुळें तेथें मुलींना निरनिराळे खेळही खेळतां येतात. ही शाळा इ० स० १८८१ चे सुमारास स्थापण्यांत आली. हल्लीं या शाळेवर मिस्. फील्डिंग या नांवाच्या विद्वान, प्रेमळ व शिक्षण कलेंत प्रवीण अशा इंग्रजी बाई लेडि सुपरिंटेंडंट आहेत, त्या शाळेची व्यवस्था फार चांगली ठेवतात व मुलींचें शील उत्तम बनविण्याची काळजी

घेतात. याच शाळेच्या आवारांत पूर्वी फीमेल ट्रेनिंग कॉलेज म्हणजे शिक्षकिणी तयार करण्याचें कॉलेज होतें, पण दोन्हींना जागा पुरेनाशी झाली, यामुळें फीमेल ट्रेनिंग कॉलेज रास्तापेठेंत नेण्यांत आलें आहे. ही शाळा जरी पुणें शहरांत आहे तरी सर्व महाराष्ट्रांतील लोकांनाही अत्यंत उपयोगी आहे. यामुळें ही प्रत्येक स्त्रीशिक्षणेच्छु मनुष्यानें अवश्य पहावी.

( १२ ) **नूतन आर्यभूषण थिएटरः**—हें नवीन नाटकगृह कोतवाल चावडी, व सिटी पोष्ट ऑफीस यांचे शेजारीं आहे. हें राजेसाहेब परांजपे यांनीं बांधलें आहे. मार्केटच्या रहदारीच्या रस्त्यावर असल्यामुळें प्रेक्षकांस व नाटक मंडळयांस हें फार सोईचें झालें आहे. शिवाय या थिएटरांत हवा सर्वत्र खेळती असल्यामुळें यांत उबावत नाहीं. सर्व ठिकाणीं नाटक उत्तम तऱ्हेनें दिसेल व भाषणें चांगलीं ऐकूं येतील, व प्रेक्षकही सपाटून मावतील अशी याची बांधणी केली आहे.

( १३ ) **नूतन मराठी विद्यालयः**—या आरंभीं चिमुकल्या असलेल्या शाळेची व्यवस्था पहाणाऱ्या 'शिक्षण प्रसारक' मंडळीनें ती शाळा अत्यंत लोकप्रिय व नमुनेदार केल्यामुळें तिची अतीशय भरभराट होऊन तिचे जोडीस आतां एक उत्तम हायस्कूल व 'न्यू पूना कॉलेज' या नांवाचें उत्तम कॉलेज झालें आहे. या वाढत्या संस्थांसाठीं हुजूर पागे समोर टोलेजंग हवाशीर व सुंदर इमारती बांधल्या आहेत. शिक्षणाची प्रगति पहावयाची असल्यास ह्या संस्थेस अवश्य भेट द्यावी. ही संस्था मूळची धाकटे शास्त्री बोवा म्हणजे निबंधमालाकार विष्णुशास्त्री चिपळोणकर यांच्या स्मरणार्थ इ० स० १८८३ सालीं काढलेली आहे.

# रविवार पेठ.

या पेठेला रविवार पेठ किंवा आदितवार पेठ असें म्हणतात. या पेठेचें क्षेत्र फळ ३२५००० चौरस यार्ड आहे, व लोकसंख्या ९८२० आहे. या पेठेला पूर्वीं मालकम पुरा असें नांव होतें. ही पेठ महाजन व्यवहारी जोशी यांनीं श्रीमंत बाळाजी बाजीराव पेशवे यांचे कारकीर्दींत वसविली. या पेठेंत वस्ती अतिशय दाट आहे. सर्व शहरांत ही पेठ अत्यंत धनाढ्य आहे. ही पेठ पुण्यांतील व्यापाराचें केंद्रस्थान आहे. या पेठेंत मोठमोठे श्रीमंत गुजराथी, जैन वैष्णव व बोहोरी व्यापारी व पेढीवाले आहेत. या गुजराथी लोकांच्या पेढ्या फार प्राचीन काळापासून चालत आलेल्या आहेत, व त्यांचा हुंड्यावर व्यवहार काशीपासून रामेश्वरापर्यंत चालतो. अजूनही गुजराथी लोक व बरेच दुसरे व्यापारी आपले पैसे पोस्टाच्या मनीआर्डरीनें पाठवीत नाहींत. येथील एखाद्या पेढीवर ते पैसे भरतात व हुंडी घेऊन परगांवीं पाठवितात, म्हणजे त्या हुंडीचे पैसे तेथल्या पेढीवाल्यांकडून त्यांना मिळतात. अशा तऱ्हेनें मनीआर्डरीपेक्षां थोड्या खर्चांत परगांवीं पैसे पाठवितां येतात. बहुतेक जुन्या पेढ्या मोतीचौकांत आहेत. याच पेठेंत सराफ आळींत सोनें मोतीं जवाहीर वगैरेच्यीं व दागदागिन्यांचीं दुकानें आहेत. त्याच्या पलीकडे तांब्या पितळेच्या भांड्यांचीं दुकानें आहेत, व त्याच्याही पलीकडे बोहोरी लोकांचीं मोठमोठालीं लोखंडी पत्रे व इतर लोखंडी व पोलादी सामान व जस्ती सामान यांनीं भरलेलीं दुकानें आहेत. घाऊक विक्रीचीं इतर जिनसांचीहीं दुकानें या पेठेंत आहेत. या पेठेंतील रस्ते व्यापारास सोईचे असे रुंद आहेत, व कांहीं रस्त्यांना तर पायीं चालणारासाठीं खास दगडी फरसबंदी फटपाथ आहेत.

**या पेठेंतील महत्त्वाचीं ठिकाणें:**—सरदार फडके यांचा वाडा, बोहोरी लोकांचा जमातखाना, सोमेश्वराचें देऊळ, जुम्मा मशीद व सरदार घोरपड्यांचा वाडा.

( १ ) **फडक्यांचा वाडा:**—हा वाडा पेशव्यांचे मुख्य सेनापती व शूर सरदार हरिपंत फडके यांनीं १७ लाख रुपये खर्च करून बांधला. तो बांधावयास पांच वर्षें लागलीं, व प्रवेश समारंभ सन १७९९ त झाला. हा वाडा फारच मोठा सात चौकांचा व सुंदर होता. याला इ० १८८५ त आग लागली. या आगीनें या वाड्याचे दोन चौक पार जळून खाक झाले. या वाड्यांत कात्रजच्या तलावाचा नळ आणलेला आहे.

( २ ) **बोहरी लोकांचा जमातखाना:**—ही इमारत प्रथम इ० स० १७३० त बांधली. तेव्हां ती लहान होती, व तिला फक्त १६०३ रुपये खर्च आला होता. पण पुढें बोहरी लोकांची फार भरभराट झाली व ते फार धर्मशील असल्यामुळें त्यांनीं पुष्कळ पैसे खर्च करून हक्काची टोलेजंग इमारत बांधली. ही इमारत बहुतकरून बंद असते. जेव्हां बोहरी लोकांचे धर्मगुरु मुल्लाजी सुरतेहून येतात तेव्हां मात्र ही उघडण्यांत येते व ते इमारतींत रहातात. ताबुताच्या दिवसांत सर्व पुणें शहरांत अत्यंत थाटाची रोषनाई या इमारतींत केलेली असते, ती पहाण्यास लोकांची अतोनात गर्दी होते.

( ३ ) **सोमेश्वराचें देऊळ:**—श्री. नारायणराव नातू यांनीं हें देऊळ इ० स० १८३० त बांधलें. हें श्री शंकराचें देऊळ असल्यामुळें येथें पुष्कळ यात्रा करणारे गोसावी येऊन उतरतात. या देवळाचा जीर्णोद्धार मारवाडी व्यापाऱ्यांनीं आपसांत वर्गणी करून केला. या देवळाच्या अंगणांत एक सार्वजनीक हौद बांधलेला आहे. या देवळाला एक नगारखानाही अलीकडे बांधला आहे. दोन बाजूंला गोसावी लोकांस उतरण्यासाठीं धर्मशाळा बांधलेल्या आहेत. या देवावर फार लोकांची भक्ती जडली आहे. कार्तिक महिन्यांत येथें मोठी जत्रा भरते.

(४) **जुम्मा मशीद**:—ही सुन्नी मुसलमान लोकांची सर्वांत मोठी नमाज पढण्याची मशीद आहे. ही इ० स० १८३९ त बांधली. तिला एकंदर १५००० रुपये खर्च आला, तो सार्वजनिक वर्गणींतून करण्यांत आला. यानंतर वेळोवेळीं या मशीदीस नवीन नवीन भाग जोडण्यांत आले. या मशिदींत एक मुख्य हॉल आहे व त्यावर एक घुमट आहे. या मशिदीचे आवारांत एक सुंदर पाण्याचा हौद व कारंजें आहे. प्रार्थना करण्यापूर्वी हात पाय तोंड धुण्यासाठीं शेजारी एक स्वतंत्र हौद आहे. येथें मुसलमानांच्या धर्मसंबंधी मोठमोठ्या सभा भरत असतात.

(५) **घोरपड्यांचा वाडा**:—हा वाडा सरदार घोरपडे यांनीं बांधला. हा फारच जुना असून अगदीं जीर्ण झालेला आहे. या वाड्याच्या मध्य भागीं एक मोठा हौद आहे, आणि त्या हौदाच्या मध्यभागीं एक लहानसें दुमजली जलमंदीर आहे. उन्हाळयाच्या दिवसांत सरदार घोरपडे या जलमंदिरांत निजत असत.

———

# शुक्रवार पेठ.

शुक्रवार पेठेचें क्षेत्र फळ ९५५००० चौरस यार्ड आहे, व लोक संख्या १७१२६ आहे. श्रीमंत बाळाजी बाजीराव उर्फ नानासाहेब पेशवे यांचे कारकीर्दींत ही पेठ जिवाजीपंत खासगीवाले यांनीं वसविली. शहरांतील सर्व पेठांत ही पेठ अधिक मोठी आहे. मुख्य मुख्य रस्ते रुंद, स्वच्छ, पक्की खडी घातलेले व सरळ आहेत.

या पेठेंत प्रेक्षणीय स्थळें खालील प्रमाणें आहेत:—

तुळशीबाग, लक्कडखाना, रेमार्केट उर्फ नवी मंडई, काळाहौद, शहरचा तुरुंग, रामेश्वराचें देऊळ, पेशव्यांची तालीम, श्री. पंतसचिव यांचा वाडा, पानसे सरदार यांचा वाडा, नंदराम नाईक यांचा वाडा, भाऊ मनसाराम याचा वाडा, म्युनिसिपल टेक्निकल स्कूल, पारसनाथाचें देऊळ, बाबा महाराजांचा वाडा, शुक्रवारचा वाडा, लक्ष्मीविलास थिएटर, आर्यन सिनेमागृह, विजयानंद नाटकगृह, इंपीरियल बँक सिटी ब्रँच, न्यायमूर्ति रानडे यांचा वाडा, सार्वजनीक सभा वगैरे स्थळें पाहाण्यासारखी आहेत. त्यांपैकीं विशेष प्रसिद्ध स्थळें आहेत तीं खालील प्रमाणें आहेत—

( १ ) **तुळशी बाग:**—या ठिकाणीं एक सुंदर राममंदिर आहे. तें श्रीमंत बाळाजी बाजीराव पेशवे यांनीं बांधलें. या ठिकाणीं पूर्वीं मोठी तुळशींच्या झाडांची बाग होती यामुळें या ठिकाणाला तुळशी बाग असें नांव पडलें. पूर्वीं या जागेतून एक मोठा ओढा वहात होता, परंतु हल्लीं हें कोणास खरें देखील वाटणार नाहीं. कारण त्याचा हल्लीं मुळींच माग-मूस नाहीं. येथें हल्लीं पूर्वींची तुळशीची बागही राहिली नाहीं, नांव मात्र राहिलें, हा सर्व काळाचा महिमा. या ठिकाणीं एकंदर तीन देवळें आहेत, मधोमध रामाचें देऊळ, उजव्या बाजूस गणपतीचें देऊळ व डाव्या बाजूस शंकराचें देऊळ आहे. रामाच्या देवळांत पांढऱ्या शुभ्र संगमरवरी

दगडाच्या तीन सुंदर मूर्ति आहेत, एक रामाची, एक सीतेची व एक लक्ष्मणाची. रामाच्या समोर एक लहान देऊळ आहे. त्यांत काळया दगडाची हात जोडून उभी असलेली रामभक्त मारुतीराय यांची मूर्ति आहे. उत्तरेच्या बाजूंस नगारखाना आहे, तेथें सकाळीं, सायंकाळीं व मध्यरात्रीं चौघडा वाजतो. श्री. नंदराम नाईक या धनिक व उदार गृहस्थांनीं २०००० रुपये खर्चून या देवळाची डागडुजी व सुधारणा केली आहे. तुळशी बागेंत दर्शनासाठीं जाणाऱ्या स्त्रीपुरुषांची नेहमीं अतोनात गर्दी असते. रामनवमीचे वेळीं येथें ९ दिवस कीर्तन होतें, त्याला सपाटून गर्दी जमते. इतर देवळांप्रमाणें या देवळालाही पर्वती संस्थानांतून कांहीं रक्कम मिळते. त्याशिवाय या देवळाच्या रस्त्याच्या बाजूस असलेल्या भागांतील दुकानांचें भाडें या देवळास मिळतें त्यांतून खर्च भागविण्यांत येतो.

**( २ ) रे मार्केट उर्फ नवी मंडई:**—पूर्वीं शनवार वाड्याच्या तटाच्या बाहेरचे मोकळे जागेंत रोजचा भाजी बाजार सकाळीं ११ वाजेपर्यंत भरत असे. परंतु उघड्या जागेंत सर्व ऋतूंत भाजी विकणें अतिशय गैरसोईचें, व अस्वच्छतेचें असल्यामुळें हल्लींचें सुंदर सुखसोयीचें व भव्य रे मार्केट इ० स० १८८५ सालीं रा० नरसोपंत गोडबोले म्यु. सेक्रेटरी यांनीं बांधलें. त्याला एकंदर खर्च दोन लक्ष रुपये आला. मुख्य इमारतींत २५० दुकानांच्या जागा आहेत व मागच्या बाजूस आणखी ३५० दुकानांची सोय ओटे बांधून केलेली आहे. वरच्या मजल्यावर म्युनिसिपल ऑफीस आहे. या मार्केटसंबंधी एक गोष्ट लक्ष्यांत ठेवण्यासारखी आहे ती ही कीं जेव्हां हें मार्केट बांधण्याचें ठरविण्यांत आलें, तेव्हां 'शनवार वाड्यापुढील ऐसपैस पटांगणांत हल्लीं मंडईचा बाजार प्रशस्तपणें भरत आहे हेंच योग्य आहे. तेथून तो उठवून शहरच्या भरवस्तीच्या अतएव कोंदट ठिकाणीं तो नेणें अत्यंत चुकीचें आहे, व लाखों रुपयांचा चुराडा करून नवीन मार्केट बांधण्याचा खटाटोप करण्याची वास्तविक मुळींच जरूर नाहीं'

अशा अर्थाची बहुतेक वर्तमानपत्रांनीं, व लोकांनीं टीका केली होती, ही गोष्ट ऐकून हल्लीं आपणांस फारच आश्चर्य वाटतें. रविवार बुधवार या दोन दिवस जेथें जुना मोडका बाजार भरतो तेथें पावसाळ्यांत व उन्हाळ्यांत भाजी विकण्यास व विकत घेण्यास जाणें किती त्रासाचें व गैरसोयीचें असेल ह्याची सहज कल्पना होते व हल्लींचें मार्केट इतकें सोयीचें व सुंदर आहे ही गोष्ट मनांत येऊन असलें सोयीचें मार्केट आम्हांला नको असें त्यावेळचे लोक म्हणाले तरी कसे याचें नवल वाटतें. पण नवल वाटण्याचें कारण नाहीं. कारण नवीन गोष्ट किंवा नवा फेरफार कितीही चांगला किंवा सोईचा असला तरी तो नवा आहे या एका गोष्टीनेंच लोक बिचकून जातात व त्याला विरोध करितात. तीच गोष्ट एकदां अंगवळणीं पडली म्हणजे सर्व ठीक चालतें. या मार्केटाला या आपल्या मुंबई इलाख्यांत अतिशय लोकप्रिय झालेल्या लॉर्ड रे या गव्हर्नरांचें नांव देण्यांत आलें आहे.

( ३ ) **शहरचा तुरुंगः**--या ठिकाणीं पूर्वी दुसऱ्या बाजीरावांचा तोफखाना होता. त्यावर मुख्य अधिकारी सरदार पानसे हे होते. पेशवाई बुडाल्यावर सन १८१८ पासून येथें तुरुंग आणला. या इमारती भोंवतीं पूर्वी एक उंच कोट व खोल खंदक होता. हल्लीं खंदक बुजवून टाकला आहे. येथला तुरुंग सुमारें ४० वर्षांपूर्वी येरवडा येथें नेला व या ठिकाणीं सिटि मॅजिस्ट्रेट, शहर मामलेदार व हवेली मामलेदार यांच्या कचेऱ्या आणल्या आहेत.

( ४ ) **रामेश्वराचें देऊळः**--हें श्री शंकराचें देउळ सरदार खासगीवाले यांनीं बांधलें. त्याला एकंदर ३५००० हजार रुपये खर्च आला. येथें माघ महिन्यांत महाशिवरात्रीला मोठा उत्सव होतो. इ० स० १८७८ त रा. रा. रघुपतराव कृष्णाजी या नांवाच्या रेल्वे कॉंट्राक्टरांनीं पुष्कळ पैसा खर्च करून या देवळाचा जीर्णोद्धार केला, व दरवाज्यावर नगारखाना बांधला. प्रसिद्ध धनाढ्य सावकार नंदराम नाईक यांनीं या देवळाच्या चौघड्यासाठीं सालीना शंभर रुपयांची नेमणूक करून दिली आहे.

( ५ ) **शुक्रवारचा वाडा**:—हा वाडा शेवटचे पेशवाई बुडवि-णारे पळपुटे बाजीराव पेशवे यांनीं इ० स० १८०४ त बांधविला. येथें ख्यालीखुशालीसाठीं कधीं कधीं हे बाजीराव रहात असत. हा वाडा दुमजली होता व याचें बांधकाम फार सुबक होतें. इ० स० १८२० त या वाड्याचा कांहीं भाग जळाला. या वाड्यात पुष्कळ उंची सामान होतें. तें सरकारनें विकून टाकलें, या वाड्यांत हल्लीं धर्मार्थ दवाखाना आहे. त्याचा गरीब गुरीबांना अतिशय फायदा होतो. सरदार पदमजी यांनीं हा दवाखाना चालविण्याकरितां बरीच मोठी रक्कम धर्मार्थ दिली होती.

( ६ ) **लक्ष्मीविलास थिएटर**:—हें नाटकगृह नुकतेंच मि. मोदी नांवाच्या थोर गृहस्थांनीं बांधलें आहे. हें आटपसर व सुंदर असून विजेच्या दिव्यांनीं युक्त आहे. येथें सिनेमाचे खेळ दररोज तीन वेळ होत असतात, व मधून मधून कांहीं नाटक मंडळयाही या नाटकगृहांत नाटकाचे प्रयोग करीत असतात

( ७ ) **आर्यन सिनेमागृह**:—हें रेमार्केट जवळच खास सिनेमा-साठीं बांधलेलें आहे. या ठिकाणींही रोज तीनदां सिनेमाचे खेळ होतात. ते फारच प्रेक्षणीय असतात. येथेंही हजारों विजेच्या बत्त्या मजा उडवून देतात.

( ८ ) **विजयानंद नाटकगृह**:—हें नाटकगृह दाणे आळींत आहे. याची बांधणी मजबूत व प्रयोगास अत्यंत सोईची आहे. हें नाट-कगृह शहरच्या मध्यावर नसल्यामुळें जशा किर्लोस्कर थिएटरवर नाटक मंडळयांच्या उड्या पडतात तशा याच्यावर पडत नाहींत. तथापि सर्व दराच्या प्रेक्षकांना जशी यांत सोय आहे तशी दुसऱ्या कोणत्याही थिए-टरांत नाहीं.

( ९ ) **इंपीरियल बँक सिटी ब्रँच**:—दाणे आळींत सन १९२२ च्या एप्रिल महिन्यापासून लोकांच्या सोईसाठीं इंपीरिअल ( बँक माजी-बाँबे बँक ) या नामांकित बँकची शाखा तिच्यासाठीं खास बांधलेल्या

भक्कम दगडी इमारतींत सुरू झाली आहे. यामुळें शहरवासी लोकांची फार सोय झाली आहे.

( १० ) **न्यायमूर्ति रानडे यांचा वाडाः**—ज्या वाड्यांतून सर्व हिंदुस्तानचा राजकीय भाग्योदय व सामाजिक सुधारणा, औद्योगिक प्रगति करणाऱ्या सर्व हिंदुस्तानाला, वंदनीय, व अत्यंत प्रिय अशा राष्ट्रीय सभा, राष्ट्रीय सामाजिक परिषद, अद्यौगिक परिषद असल्या महत्त्वाच्या संस्थांचा प्रथम उगम झाला, ज्या वाड्यांत राहून अर्वाचीन महर्षि व हिंदुस्तानचे ग्लॅडस्टन किंवा नानाफडणीस ही पदवी प्राप्त करून घेणारे अलौकिक बुद्धिमान् न्यायमूर्ति माधवराव गोविंद रानडे यांनीं रात्रंदिवस स्वदेशहितासाठीं आपला देह झिजविला तो वाडा एकदांतरी पाहिल्याशिवाय कोणाच्यानें रहावेल ? वाचकहो जा आणि पहा. पहा तो रे मार्केट लगतच आपल्या साध्या भोळ्या स्वरूपानें आपल्या पुण्यशील मालकाचें स्मरण करून देत देत तुमचें स्वागत करण्यास उत्सुकतेनें उभा आहे.

( ११ ) **सार्वजनिक सभाः**—कै० गणेश वासुदेव जोशी उर्फ सार्वजनिक काका ह्यांच्या इतका थोर कर्तव्यनिष्ठ स्वदेशभक्त या महाराष्ट्रांत झाला नाहीं असें म्हटलें तरी चालेल. महाराष्ट्रांतील प्रजापक्षाची बाजू मुंबईसरकार, हिंदुस्तानसरकार व खुद्द विलायतेंतील राजेसाहेब व पार्लमेंट यांचे पुढें जोरदारपणानें मांडावी, लोकांच्यीं जीं गाऱ्हाणीं व ज्या अडचणी असतील त्या थेट विलायत सरकार पुढें धडक व यथातथ्य मांडाव्या व लोकांचे हक्काचें संरक्षण करावें व लोकांच्या अडचणींचें निवारण करून द्यावें, ह्या हेतूनें मोठ्या प्रयत्नानें बऱ्याच थोर लोकांच्या मदतीनें वरील अलौलिक देशभक्त कै० गणेश वासुदेव जोशी ऊर्फ सार्वजनिककाका यांनीं 'सार्वजनीक सभा' या नांवाच्या संस्थेची स्थापना ता० २ एप्रील सन १८७० रोजीं औंधचे संस्थानिक श्रीमंत पंतप्रतिनिधि यांच्या अध्यक्षतेखालीं स्थापन केली. त्यावेळीं सार्वजानिक काकांच्या खटपटीनें दक्षिणेंतील मोठमोठे संस्थानिक, सरदार, राजेरजवाडे, जहागिरदार, इनामदार,

सरकारी नोकर, बडे पेन्शनर, वकील, व्यापारी व इतर विद्वान गृहस्थ या सभेचे सभासद झाले. रयतेच्या कल्याणाकरितां या सभेनें पुष्कळ महत्त्वाची व बहुमोल कामगिरी अनेक वेळां बजावली. आपली बाजू इतक्या मुद्देसूदपणें व भरभक्कम पुराव्यानिशीं वेळोवेळीं तिनें मांडली कीं सरकारलाही या सभेच्या म्हणण्यास मान द्यावा लागला आहे व या सभेच्या म्हणण्याप्रमाणें फेरफार करावे लागले आहेत. यामुळें या सभेचा लौकिक विलायतेंतील पार्लमेंटसभेपर्यंत गेलेला होता. या सभेइतकी वजनदार सभा महाराष्ट्रांतच काय पण साऱ्या हिंदुस्तानांत गेल्या शतकांत नव्हती. सभेच्या कामाची माहिती सर्वांस व्हावी ह्या उद्देशानें एक इंग्रजी त्रैमासिक व एक मराठी मासिक नियमानें अत्यंत उपयुक्त माहितीनें भरलेलें निघत असे. असें बरींच वर्षें ठीक चाललें होतें. पण पुढें मतभेदामुळें या सभेंत दोन पक्ष झाले, त्यांपैकीं एका पक्षाचें बहुमत या सभेंत झालें. व दुसरा पक्ष या सभेंतून फुटून बाहेर निघाला. यामुळें व दुसऱ्या अनेक कारणांमुळें या सभेचें काम पूर्वीच्या इतकें जोरदारपणानें हल्लीं होत आहे असें वाटत नाहीं. पूर्वीं या सभेंत न्यायमूर्ति रानडे, ना० गोखले वगैरे मंडळी होती. ती आपलें या सभेंत कांहीं चालत नाहीं असें पाहून या सभेंतून फुटली व आपल्या मतांप्रमाणें काम करण्याकरतां त्यांनीं दुसरी एक सभा काढली, तिचें नांव 'डेकन सभा.' सर्व हिंदुस्तानांतील सर्व चळवळींचा मूळ उगम या आमच्या पुण्यांतच असावयाचा. राष्ट्रीयसभा, सामाजिक परिषद, औद्योगिक परिषद, महिला परिषद, गणपती उत्सव, शिवजयंत्युत्सव, स्वदेशी राष्ट्रीय शिक्षण, स्वराज्य व सहकारीसंघ या सर्व देशहितवर्धक चळवळींचा व संस्थांचा उगम या पुण्यभूमींतच झालेला आहे. त्याचप्रमाणें या सर्व भरतभूमींत आतां लाहोरपासून लंकेपर्यंत पसरलेले राष्ट्रीय नेमस्त हे पक्ष घ्या, यांचाही उगम प्रथम या पुण्यपत्तनांतच झालेला आहे. त्यांचा खरा उगम सन १९०५ सालीं झाला व तो सार्वजनिक सभेचीं दोन शकलें होऊन झाला. एक शकल आपणांस पुढें राष्ट्रीय पक्ष म्हणवूं लागलें; यानेंच सार्वजनिक सभा काबीज केली.

दुसरापक्ष उर्फ शकल या सभेंतून बाहेर पडला, व आपणांस नेमस्त म्हणवूं लागला. व त्यानें आपली ' डेक्कन सभा ' स्थापन केली. हे दोनही पक्ष अत्यंत थोर, अत्यंत कर्तृत्ववान, कट्टे स्वदेशभक्त, अत्यंत विद्वान् व अत्यंत वंदनीय अशा थोर नरवीरांनीं भरलेले आहेत. यांचें काम एकच आहे, पण मार्ग जरा भिन्न आहेत. ईश्वर कृपेनें जर यांचें ऐक्य घडून येईल तर हिंदुस्तानचा भाग्योदय होण्यास मुळींच उशीर लागणार नाहीं. हें अशक्य असें कांहीं म्हणतील, पण हिंदुमुसलमानांची एकी ही त्याहूनही अशक्य गोष्ट नव्हती का ? ती जर आतां शक्य झाली आहे तर हीही गोष्ट घडून येण्यास हरकत नाहीं. फक्त या गोष्टीला देवाची मदत पाहिजे. तेव्हां आपली ईश्वराजवळ हीच प्रार्थना आहे कीं देवा ह्या दोन पक्षांची एकी घडवून आण व या एकीनें हिंदुस्तानाला चांगले दिवस दाखव.

---

# नारायण पेठ.

हीं पेठ श्रीमंत नारायणराव पेशवे यांनीं इ० स० १७७१ मध्यें वस-
विली ही पेठ शहराच्या पश्चिम टोंकाला आहे. ह्या पेठेंत मुख्य वस्ति
मारवाडी व्यापाऱ्यांची आहे. त्याशिवाय डोलकर आळी म्हणून या
पेठेचा एक भाग आहे, त्यांत ब्राम्हणांचीं हवाशीर, अलग अलग, व
सुबक अशीं घरें बरींच आहेत. या पेठेचें क्षेत्रफळ ३७५००० चौरस
यार्ड आहे व लोकसंख्या ४८५९ हजार आहे. या पेठेंतील बहु-
तेक लोक खाऊन पिऊन सुखी आहेत. आरोग्याच्या दृष्टीनें देखील ही
पेठ चांगली आहे.

**या पेठेंतील मुख्य महत्त्वाचीं ठिकाणें:—**

१ मोदीचा गणपती, २ मातीचा गणपती, ३ अष्टभुजादेवीचें देऊळ,
४ गायकवाडांचा ( हल्लीं टिळकांचा ) वाडा, ५ मागकेश्वर विष्णूचें
देऊळ, ६ निबंधमालाकार कै० विष्णूशास्त्रि चिपळूणकरांचा वाडा,
७ लकडी पूल. या पैकी विशेष प्रसिद्ध आहेत तीः—

( १ ) **गायकवाडांचा वाडा:**—हा वाडा श्रीमंत गायकवाड सर-
कार यांनीं आपल्यास पुण्यास वारंवार रहावयास यावें लागतें तेव्हां
स्वतःचें रहाण्याचें ठिकाण असावें म्हणून बांधला. ह्या वाड्यास अतिशय
मोठें खुलें पटांगण असून हा रस्त्यालगत एखाद्या चाळी सारखा लांबच
लांब बांधलेला आहे. याला दोन मजले आहेत हल्लींच्या महाराष्ट्राचे
जीवकी प्राण असें लोकमान्य बळवंतरावजी टिळक यांच्या सतत पंधरा
वर्षांच्या निवासानें हा वाडा म्हणजे देशभक्तीचें व स्वार्थत्यागाचें पुण्य-
क्षेत्र बनला आहे. हा वाडा लोकमान्य बाळ गंगाधर टिळक यांनीं सन
१९०५ च्या सुमारास श्रीमंत गायकवाड सरकार पासून सुमारें १५०००

रुपयांस विकत घेतला. विकत घेतल्यानंतर आपल्या छापखान्यास व केसरी व मराठा ऑफिसांना सोईवार पडावें म्हणून पुष्कळ पैसे खर्च करून या वाड्यांत त्यांनीं बरेच फेरफार केले व कांहीं भाग नवीन बांधले. या वाड्यांत त्यांनीं स्वतःस रहाण्यासाठीं एक दुमजली हवाशीर बंगला बांधला आहे. शिवाय छापखान्याचेसाठीं व वर्तमानपत्राचे साठीं हजारों रुपयांचा कागद सांठवण्यासाठीं अग्नीला दाद न देणाऱ्या इमारती बांधल्या आहेत. त्यांनीं या वाड्यांत सर्व हिंदुस्थानांत अपूर्व असें छापखान्याचें यंत्र आणलें आहे. त्या यंत्रावर एका दिवसांत चाळीस चाळीस हजार प्रति छापून, मोजून व घड्या होऊन आपोआप बाहेर पडतात. हें यंत्र चालू असतांना पाहिलें म्हणजे मनुष्याच्या कल्पकतेची व यंत्राच्या प्रचंड सामर्थ्याची ही विलक्षण प्रगति पाहून मन आश्चर्यानें थक्क होऊन जातें. या वाड्यांत लो. टिळकांचा पुतळा व अनेक मोठीं तैल चित्रें आहेत. तीं अवश्य पहावीं. हा वाडा गणपती उत्सवाच्या दहा दिवसांत हजारों लोकांच्या सभांनीं अगदीं फुलून जातो. इतर प्रसंगींही ५।७ हजार लोकांच्या सभा या वाड्यांत सहज भरवितां येतात. लोकमान्य टिळकांची जुबिली, वगैरे संस्मरणीय प्रसंग याच वाड्यांत झाल्यामुळें हा वाडा म्हणजे महाराष्ट्राचें मोठ्या प्रेमळ भक्तीचें ठिकाण होऊन बसलें आहे. या वाड्यांत राजकीय चळवळीचीं व केसरी मराठा पत्रांचीं ऑफिसें आहेत.

( २ ) **चिपळूणकरांचा वाडा**:—रावबाजींच्या वेळे पासून हाडीं मांसीं खिळलेला महाराष्ट्राचा नेभळेपणा घालवून स्वाभिमानाची, बाणेदारपणाची देशप्रेमाची व आत्मविश्वासाची नवीन तेजस्विता ज्या थोर पुरुषानें आपल्या जोरदार लेखणीनें व यशस्वी शाळा, वर्तमानपत्रें मासिक पुस्तकें वगैरेंनीं अवघ्या बत्तीस वर्षांच्या अल्पवयांत, महाराष्ट्राला परत आणून दिली, व नवीन विचार, नवीन भाषा पद्धति, नवीन शाळा, व नवीन वळण लावून देऊन ज्यानें नवीन मन्वंतर सुरू केलें, व अर्वाचीन महाराष्ट्राचा जनक हें पद प्राप्त करून घेतलें अशा तजस्वी श्री. विष्णुशास्त्री चिप-

छगकरांनीं जेथें राहून हे पराक्रम केले व ज्या घरांत अवतार संपवून देह ठेवला तें घर म्हणजे महाराष्ट्राचें माहेर घरच नाहीं का ? वाचकहो विष्णु-शास्त्री यांचें हें घर जर विलायतेंत असतें तर त्या लोकांना तें कोठें ठेवूं नी कोठें नको ठेवूं असें झालें असतें. असो निदान पुण्यास गेल्याबर या पुण्याश्रमाचें दर्शन घेऊन आपल्या नेत्रांस पावन करण्यास विसरूं नका. तुम्हांस खूण सांगू का, जा ती पहा त्यांच्या डॉक्टर पुतण्यांची पाटी अनेक पदव्यांनीं भूषित अशी, त्यांच्या दारावर झळकत आहे.

( ३ ) लकडीपूल:—हा पूल मुठा नदीवर बांधलेला आहे. हा जरी हल्लीं दगडाचा बांधलेला आहे. तरी तो मूळ लाकडांचा होता, आणि म्हणूनच त्याला लाकडी पूल अथवा लकडी पूल असें सार्थ नांव पडलें आहे. हा पूल प्रथम श्रीमंत बाळाजी बाजीराव उर्फ नानासाहेब पेशवे यांनीं इ० स० १७६१ त बांधविला. खुद्द पेशवे पुलावर काम पुरें होई-पर्यंत हजर असत. ह्याचें काम इतक्या झपाट्यानें चालविलें होतें कीं हा अवघ्या सहा दिवसांत बांधून पुरा झाला. आगगाडीचा इकडे संचार होण्याचे आधीं या पुलावरूनच हजारों लोक मुंबईस जात असत. हा पूल मुठा नदीवर बांधलेला आहे. इ० स० १८४० ह्यावर्षीं मुठानदीला मोठा पुर आला व त्या पुरानें हा पूल मोडून वाहून गेला. तेव्हां इंग्रज सरकारनें इ० स० १८४० त कांहीं आपल्या मदतीनें व बाकी लोकांनीं जमविलेल्या ४७००० रुपयांनीं हा दगडांनीं बांधून काढला. आतां हा दगडी बांधला आहे तरी याचें बाळपणाचें सार्थ नांव जें लकडीपूल तें अजून तसेंच चालू आहे.

---

# सदाशिव पेठ.

सदाशिव पेठ ज्या ठिकाणीं वसलेली आहे त्या ठिकाणीं पूर्वीं एक मोठी बाग होती. या पेठेचें क्षेत्रफळ २२७५००० चौरस यार्ड आहे व लोकसंख्या सुमारें ११०८६ आहे. ही पेठ नानासाहेब पेशवे यांचा चुलत भाऊ सुप्रसिद्ध वसईचा मोहरा चिमाजी आप्पा यांचा पुत्र सदाशिवराव भाऊ यानें वसविली. या पेठेंत मुख्य वस्ती ब्राह्मणांची आहे. या पेठेंतील रस्ते सरळ व रुंद आहेत, याचें कारण या पेठेंत पेशव्यांचें सेनापति सदाशिवरावभाऊ व त्यांचें सैन्य यांची वस्ती होती. यामुळें सैन्याच्या सोईसाठीं, व हालचालींसाठीं रुंद व प्रशस्त असे रस्ते ठेवावे लागले. राजकीय कैदी देखील याच पेठेंत ठेवण्यांत येत असत. सर्व शहरांत या पेठेला विशेष मान आहे. सर्व पेठांपेक्षां ही पेठ हवा पाण्याला व आरोग्याला उत्तम आहे असा सर्वसाधारण समज आहे व तो खरा आहे. इतर पेठांपेक्षां या पेठेंतील घरें अधिक भक्कम बांधलेलीं, सुबक, हवाशीर व सुटीं सुटीं आहेंत. बहुतेक घरांना दोन किंवा तीन मजले व अंगणें आहेत. शेवटल्या बाजीरावांचे वेळीं या पेठेची वस्ती भराभर वाढत गेली, व हल्लीं देखील ती झपाट्यानें वाढत आहे. इतर पेठांपेक्षां घरांच्या किंमती या पेठेंत अतिशय वाढल्या आहेत. भाड्याचें मान तर अतीशयच वाढलें आहे. इतर पेठांत आठ किंवा बाराआणे खण तर या पेठेंत रहाण्याच्या जागेलाही दीड पासून दोन रुपये खण दरमहाचें भाडें झालें आहे. दुकानांना तर काय भाडें मागतील नी काय नाहीं याचा नियमच नाहीं. इंग्रजी अम्मल सुरू झाल्यावर या पेठेचा जो भाग वसला त्याला नवी पेठ असें नांव पडलें आहे. सदाशिव पेठेंत, विठोबाचें देऊळ, खुन्यामुरलीधराचें देऊळ, नरसोबाचें देऊळ, खजिन्याची विहीर, सोट्या म्हसोबा,

ज्ञानाचा बाग, सेवासदन, विश्रामबागेचा वाडा, पंत प्रतिनिधींचा वाडा, पुष्करणीचा हौद, सदाशिव पेठचा हौद, डेक्कनसभा व डेक्कन लिबरल क्लब, चित्रशाळा प्रेस, डेक्कन प्रिंटिंग वर्क्स, नाथीबाई थाकर्सी गर्लस हायस्कूल, शिवाजी मंदीर, वगैरे प्रेक्षणीय स्थळें आहेत. त्या पैकीं कांहीं जास्त प्रसिद्ध आहेत ती.—

( १ ) **सदाशिव पेठचा हौदः**—हा हौद फार नामांकित आहे. या हौदाचें पाणी फार चांगलें व आरोग्यकारक आहे. यामुळें पुष्कळ लोक या हौदाचें पाणी प्यावयास नेतात. विशेषतः आजारी माणसास पिण्यासाठीं या हौदाचें पाणी नेतात. हा सुप्रसिद्ध हौद अत्यंत थोर व हुशार मुत्सद्दी नाना फडणीस यांनीं इ० स० १७९० मधें बांधला. आंबेगांव म्हणून एक लहान खेडेगांव पुण्यापासून सहा मैलांवर आहे. त्या खेड्यांतलें पाणी फार चांगलें व आरोग्यवर्धक आहे अशी सर्वत्र प्रसिद्धि आहे. तेथील पाणी चिरेबंदी पक्के नळ बांधून नानांनीं या हौदांत आणलें आहे.

( २ ) **पुष्करणीचा हौदः**—हा हौद देखील नाना फडणीस यांनींच बांधला. याचेंही पाणी आंबेगांव येथूनच आणलेलें आहे, व तें सदाशिव पेठच्या हौदाप्रमाणेंच अतिशय आरोग्यवर्धक आहे यामुळें शहरांत दूरवर हें पिण्यास नेतात. या हौदावर पूर्वीं सुंदर द्राक्षवेलींचे मंडप असत, यामुळें फारच मजेदार देखावा दिसत असे. सकाळीं व सायंकाळीं या रम्य ठिकाणीं द्राक्ष मंडपांखालीं ब्राह्मण लोक स्नान संध्या करीत बसत तेव्हां ती एक अपूर्व शोभा दिसत असे. या हौदाला बांधण्यास एकंदर ८५०० रुपये खर्च आला.

( ३ ) **विश्राम बागचा वाडाः**—हा वाडा शेवटले पेशवे धाकटे बाजीराव यांनीं बांधला. ह्या वाड्यास एकंदर २००५४० रुपये खर्च आला. इ० स० १८०३ पासून १८०९ पर्यंत याचें बांध काम चालू होतें. वाडा दुमजली आहे व याला तीन चौक आहेत. या वाड्याला विश्रामबागवाडा हें नांव कां पडलें या बद्दल दोन दंतकथा आहेत. एक दंतकथा अशी आहे कीं श्रीमंत धाकटे बाजीराव पेशवे यांनीं हा वाडा

आपल्याला पूर्ण विश्रांति उपभोगावयास सांपडावी म्हणून बांधला व या वाड्यांत विश्रांति घेण्यासाठीं व चैन करण्यासाठीं ते जाऊन रहात असत यामुळें या वाड्याला विश्राम बागचा वाडा असें नांव पडलें. दुसरी दंत-कथा अशी आहे कीं हा वाडा बांधला तेव्हां त्याला शोभा देण्यासाठीं एक त्याला जोडून बाग तयार केला. त्या बागावर आरंभा पासून विश्राम नांवाचा एक माळी ठेवला होता, त्या माळ्याच्या नांवावरून त्या बागेला विश्राम बाग असें नांव पडलें व त्या बागेंतला वाडा म्हणून या वाड्याला विश्राम बागचा वाडा असें नांव पडलें.

ह्या वाडा म्हणजे दुसऱ्या बाजीरावांचें चैनीचें स्थान असल्यामुळें, य वाड्याकडे दरमहा सपाटून खर्च होत असे. नुसत्या नोकर लोकांनाच दरमहा चारशें रुपये पगार होता. व हा वाडा बांधण्यांत बाजीरावांचा जो मुख्य उद्देश विश्रांति मिळावी तो लवकरच साध्य झाला. लवकरच दयाळू इंग्रज सरकारनें त्यांना राज्य कारभाराच्या दगदगींतून सोडविलें व आठ लक्ष रुपये पेनशन देऊन हरीहरी म्हणत ब्रम्हावर्तास कायमची अखंड विश्रांति घ्यावयास पाठविलें. पेशवाई बुडाल्यावर सन १८१८ सालीं या वाड्याची मालकी इंग्रजाकडे आली. नंतर लवकरच इंग्रज सरकारनें या वाड्यांत एक संस्कृत विद्या व शास्त्रें शिकविण्यासाठीं पाठ-शाळा स्थापन केली. व तेथील परीक्षा पास होत त्यांना दक्षिणा मिळत असे. ही दक्षिणा पूर्वीं पेशवाईत पर्वतीच्या पायथ्याशीं रमणा म्हणून याच कामासाठीं बांधलेल्या इमारतींत गांवोगांवाहून आलेल्या विद्वानांची परीक्षा घेऊन योग्यते प्रमाणें देत असत. ती दक्षिणा बंद करून त्या दक्षणेसाठीं खर्च होणाऱ्या रकमे पैकीं थोडासा पैसा खर्च करून ही पाठशाळा काढली होती. पुढें सन १८४२ त ह्या वाड्यांत इंग्रजी शाळा सरकारनें सुरू केली. थोडेसें इंग्रजी शिकतांच मोठमोठ्या नोकऱ्या मिळूं लागल्या, यामुळें पुष्कळ मुलें या शाळेंत शिकूं लागलीं. हें पाहून सरका-रनें इ० स० १८५६ मध्यें डेकन कॉलेज या नांवाचें उच्च शिक्षण देणारें कॉलेज या वाड्यांत सुरू केलें. तेथेंही मुलांची फार गर्दी झाली म्हणून

येरवडा येथें अत्यंत सुंदर व भव्य अशी इमारत २४५९६३ रुपये खर्च करून सरकारनें बांधली व तेथें इ० स० १८६८ सालीं डेकन कॉलेज नेलें. व सर्व विश्रामबागचा वाडा इंग्रजी शाळेस म्हणजे हायस्कूलास दिला. पुढें या वाड्याला सन १८७९ सालीं आग लागली व या वाड्याचे पुढचे दोन चौक जळून गेले. ते सार्वजनिक वर्गणी व सरकारची मदत यांनीं पुनः बांधून काढले आहेत. या वाड्यांत सन १९२२ च्या एप्रील महिन्यापर्यंत सरकारी हायस्कूल होतें. पण सरकारचा खर्च अतोनात वाढला, त्याची छाटाछाट करण्याकरितां हें हायस्कूल अजीबात बंद करून टाकावें असें सरकारनें ठरविलें व त्या प्रमाणें इ० स० १९२२ च्या जून मधें हें हायस्कूल बंद होऊन हा वाडा रिकामा झाला. इतक्यांत मराठ्यांच्या वैभवाचें स्मारक होऊन शनवार वाडा सज्ज करून ठेवावयाचा व तेथें एक संग्रहालय व एक बाग ठेवावयाचा व तेथें असलेल्या कोर्टांना बाहेर काढून त्यांच्या इमारती खणून त्यांचे खालीं पुरून गेलेले जुन्या वाड्याचे अवशिष्ट भाग लोकांना पहाण्यासाठीं राखून ठेवावयाचे असें सरकारनें ठरविलें, यामुळें शनवार वाड्यांतलीं दिवाणी कोर्टें या रिकाम्या झालेल्या विश्रामबागवाड्यांत आलीं आहेत. आहे कीं नाहीं काळाची विचित्र गती. ज्या वाड्यांत पेशवे सरकारनें चैन करावी, त्यांतच पुढें वेदांचा घोष सुरू व्हावा, नंतर तेथेंच वेद घोषास खो देऊन इंग्रजी विद्येचा विलास सुरू व्हावा. ही विद्या येथें ऐन क्रीडा करण्यांत दंग झाली असतां तिची हकालपट्टी करून आतां त्याच ठिकाणीं दिवाणी कोर्टें ऐटबाज वकील, वादी प्रतिवादी, सावकार व कुळें यांचा सुळसुळाट व्हावा, तेव्हां ' कालाय तस्मै नमः. ' या वाड्याच्या मागच्या चौकांत तीन लहान हौद आहेत, व या वाड्याच्या बाजूला एक मोठा हौद आहे त्याचें नांव पुष्करणीचा हौद. या सर्व हौदांचें पाणी अतिशय आरोग्यवर्धक आहे.

( ४ ) **नरसोबाचें देऊळ**:—सदाशिव पेठेच्या एका भागाला कारकोळ पुरा असें नांव आहे. त्या पुऱ्यांत हें देऊळ आहे. गणू जोशी

या नांवाच्या इसमानें हें देऊळ लोकांकडून वर्गणी गोळा करून इ० स० १७८८ सालीं बांधलें. हा देव नवसास हटकून पावतो, अशी याची कीर्ति आहे, यामुळें पुष्कळ लोक याला नवस करितात, यामुळें या देवाला नवसांपासून सपाटून पैसे मिळतात. हा देव म्हणजे श्री विष्णूचा चौथा अवतार नरसिंह. हिरण्यकश्यपु या नांवाचा एक क्रूर राक्षसांचा राजा लोकांना अतिशय छळीत असे, त्याला ठार मारून लोकांचें दुःख दूर करण्यासाठीं श्रीविष्णूंनीं हा अवतार धारण केला. हिरण्यकश्यपूला आपल्या सिंहाच्या तोंडानें फाडीत आहे अशा तऱ्हेची ह्या देवाची मूर्ति या देवळांत आहे.

( ५ ) **खुन्या मुरलीधरः**—खुन्या मुरलीधराचें देऊळ सदाशिव पेठेंत, नरसोबाच्या देवळा जवळ आहे. ह्या देवळांत मुरली वाजवीत असलेली श्रीकृष्णाची फारच सुंदर मूर्ति आहे. ती सुप्रसिद्ध मूर्तिकार बखतराम यानें घडविलेली आहे. ही मूर्ति दादा गद्रे या नांवाच्या गृहस्थानें बखतरामाकडून तयार करविली व देऊळ बांधून येथें तिची स्थापना केली. ह्या मूर्तीची स्थापना होण्याचे सुमारास बरीच खडाजंगी झाली व रक्तपात होऊन कांहीं खूनही पडले, यामुळें या मुरली धारण करणाऱ्या मुरलीधराला खुन्यामुरलीधर असें नांव पडलें. खून पडण्याचें कारण हें कीं अशा तऱ्हेची एक अप्रतीम सुंदर मूर्ति दादा गद्रे यांनीं तयार करविली आहे व तिची स्थापना ते सदाशिव पेठेंत करणार आहेत ही गोष्ट सुप्रसिद्ध मुत्सद्दी नानाफडणीस यांना समजली. ती त्यांनीं दादा गद्रे यांच्या घरीं जाऊन पाहिली. तेव्हां ही सुंदर मूर्ति आपल्या बेलबागेंत स्थापण्यास मिळावी अशी त्यांना फार इच्छा झाली. म्हणून ती गोष्ट त्यांनीं दादा गद्रे यांचेकडे काढली, व हरतऱ्हेनें ती मूर्ति दादानें आपणांस द्यावी म्हणून त्यांनी दादाचें मन वळविण्याचा अतिशय प्रयत्न केला, पण तो सर्व फुकट गेला. तेव्हां आर्जव करून साध्य होत नाहीं तें दंडेलीनें साध्य करून घ्यावें असा नानाफडणीस यांनीं विचार केला. नंतर ज्या दिवशीं सकाळीं मूर्तीची प्राणप्रतिष्ठा व्हावयाची होती त्या दिवशीं मोठ्या पहाटेस

बळजबरीनें मुर्ति हिसकाऊन आणण्यासाठीं नाना फडणीस यांनीं शूर अरब घोडेस्वार पाठविले. परंतु होणार तें होणार, यामुळें ते घोडेस्वार चुकीचा समज होऊन दुसऱ्याच ठिकाणाकडे गेले. तेथें गेल्यावर त्यांची चूक त्यांच्या लक्ष्यांत आली व ते परत सदाशिव पेठेकडे वळले. यामुळें बराच उशीर झाला. मग दादा गद्रे यांचेवर हल्ला करून मूर्ति ताब्यांत घ्यावी म्हणून त्यांनीं दादां कडील लोकांवर हल्ला केला. त्या चकमकींत व झटापटींत कांहीं लोक मरून पडले व कांहीं जखमी झाले. ही झटापट चालू असतांच तिकडे मूर्तीची प्राणप्रतिष्ठा होऊन स्थापनही होऊन गेली. तेव्हां स्थापन झालेली मूर्ति उचलणें हें महापातक आहे. यामुळें तुम्हीं आतां आपला आग्रह सोडा असें बऱ्याच वजनदार गृहस्थांनीं नाना फडणीस यांना समजावून सांगितलें तेव्हां निरुपाय होऊन नानांनीं त्यांचें म्हणणें कबूल केलें व अरब घोडेस्वारांना परत बोलावलें व अशा तऱ्हेनें अखेर तें प्रकरण कसें तरी मिटलें, व त्या दिवसापासून या देवाला खुन्या मुरलीधर हें जोडनांव प्राप्त झालें.

( ६ ) हिराबागः—हा भव्य, अफाट व सुंदर बाग व यांतील वाडा श्रीमंत धाकटे बाजीराव पेशवे यांनीं आपल्या ख्याली खुशाली साठीं व रंगेल चैनी साठीं बांधविला. या ठिकाणीं ते मनसोक्त चैन करीत असत, व कधीं कधीं इंग्रजासारख्या आपल्या पाहुण्यास मेजवान्या देत असत. लॉर्ड व्हॅलेंशिआ या बड्या इंग्रजी पाहुण्याला रावबाजींनीं या बागेंतील वाड्यांत बडी मेजवानी दिली होती, तिचें वर्णन सदरहू इंग्रज सरदारानें लिहून ठेवलें आहे, त्यावरून बाजीरावाच्या उधळपट्टीची थोडीशी कल्पना होते. आतां हा वाडा पडीत स्थितींत आहे यामुळें तो पूर्वीइतका सुंदर व भव्य दिसत नाहीं, तरी हल्लीं देखील त्याचें मूळचें वैभव काय असेल याची कल्पना त्याच्याकडे पाहिलें असतां झाल्याशिवाय रहात नाहीं. हा वाडा खरोखरच फार रमणीय आहे. या वाड्याच्या सभोंवतालच्या बागांतील एका भागांत सुंदर व सुवासिक फुलझाडांचे फुलांनीं भरलेले ताटवेच्या ताटवे लागले आहेत व दुसऱ्या भागांत गगन-

चुंबित अनेक जुनाट व मोठमोठे वृक्ष उभे आहेत. एका बाजूला पर्वतीचें आर्द्रो ठगठजीत कोरडें पडलेलें व बरेंच बुजवीत आणलेलें तळें आहे, त्या तळ्याच्या बाजूला शहरचा टाऊन हॉल आहे. या हॉल मध्यें परम-पूज्य न्यायमूर्ति रानड्यांच्या वेळीं मोठमोठ्या सभा भरत असत. याच ठिकाणीं या रावबाजींच्या वाड्यांत हल्लीं येथें डेक्कन क्लब या नांवाचा एक क्लब आहे. हा क्लब इ० स० १८९१ सालीं स्थापन झाला. सर्व धर्मांच्या, सर्व जातींच्या, व सर्व दर्जांच्या सद्गृहस्थांस एकत्र होण्यास व एकेठिकाणीं चार घटका खेळून, गप्पा टप्पा करून मन रमविण्यास व एकी करण्यास हा क्लब हें एक अत्यंत उत्कृष्ट साधन झालें आहे. हा क्लब राजकीय चळवळ बिलकूल हातांत घेत नाहीं. या क्लबाचा मुख्य उद्देश हिंदु, ख्रिश्चन, पारशी, मुसलमान, जैन वगैरे सर्व लोकांचें दळण-वळण वाढावें व एकमेकांत मैत्री व प्रेम वाढावें हा आहे. एकाकाळीं सर्व पुणें शहराला आपल्या सौंदर्यानें अत्यंत शोभा आणणाऱ्या पर्वती तळ्याच्या कांठीं असलेल्या भव्य वाड्यांत हा क्लब आहे. बिचाऱ्या त्या सुंदर पर्वती तळयावर आधुनिकशास्त्र कल्पनांची धाड पडली. ह्या तळ्यामुळें पुण्याची हवा बिघडली आहे असें ठरविण्यांत आलें. लगेच एकाकाळीं जलविहार करण्यास उत्तम साधन असलेलें हें मनोहर तळें कोरडें पाडण्यांत आलें, व आतां सर्व शहरच्या केरकचऱ्याचें तें आगर बनाविलें आहे. पण चमत्कार हा आहे कीं तळें जसजसें बुजवीत आणलें जात आहे तसतसा पुण्यांतला मलेरिआ उलटा अधिकाधिक वाढत चालला आहे. सगळ्या दिवसभर धडपडणाऱ्या धांवपळीच्या जगांत सपाटून काम धंदा केल्यावर चार घटका शांततेचें व एकांताचें सुख जगाच्या दंगली-पासून दूर जाऊन उपभोगण्यास या गगनचुंबित वृक्षांच्या गर्द झाडींत गुरफटून गेलेल्या शांत व रमणीय स्थलासारखें दुसरें स्थळ निदान या पुण्यांत तरी दुसरें नाहीं. या बागाला हिराबाग असें नांव कां पडलें हें नक्की सांगणें कठीण आहे. अशी एक दंतकथा आहे कीं, २ रे बाजीरावसाहेब यांची हिरा या नांवाची एक ठेवलेली व आवडती बाई होती तिला येथें

ठेवलें होतें. तिच्या नांवावरून ह्या बागाला हिराबाग असें नांव पडलें. या बागेंत वर सांगितल्याप्रमाणें 'डेक्कन क्लब' इ० स० १८९१ सालीं स्थापन झाला. तेव्हां पासून आतां पर्यंत तो चांगला चालला आहे. या क्लबांत मोठमोठे प्रोफेसर, सरदार, सावकार जहागिरदार व बडे अधिकारी मोकळया मनानें चार घटका हास्यविनोदांत व टेनिस, क्रिकेट, बिलिअर्ड वगैरे खेळ खेळण्यांत घालवितात. या क्लबाची एक लायब्ररी व वाचनालय आहे. शिवाय टेनिस खेळण्याचें कोर्ट, बॅडमिंटन खेळण्याचें कोर्ट, बिलिअर्ड खेळण्यासाठीं उत्तम बिलिअर्ड टेबल, दिवाणखाना, व पत्ते, सोंगट्या बुद्धिबळें वगैरे बैठे खेळ खेळण्यासाठीं एक दिवाणखाना या क्लबांत आहे. अलीकडे क्लबाच्या बाहेरगांवच्या मेंबरांस येथें उतरण्यासाठीं सर्व सोयींनीं युक्त अशा खोल्या नवीन बांधल्या आहेत. या क्लबांत रिफ्रेशमेंटचीही व्यवस्था केलेली आहे. हल्लीं या क्लबांत युरोपिअन व हिंदी बडेअधिकारी व ख्रिस्ति, हिंदु, मुसलमान, पारशी वगैरे धर्माचे बरेच मेंबर आहेत. सर्व जातींचे व धर्मांचें लोकांची दर रविवारीं येथें बरीच गर्दी जमते.

( ७ ) **डेक्कनसभा**—सुप्रसिद्ध सार्वजनिक सभे मध्यें आपले धोरणानें व आपल्या मतांप्रमाणें काम करणें अशक्य झालें असें पाहून न्यायमूर्ति रानडे, ना० गोखले वगैरे सुप्रसिद्ध नेमस्त पुढाऱ्यांनीं त्या सभेंतून आपलें आंग काढून घेतलें व इ० स० १८९५ च्या सुमारास आपल्या मतांप्रमाणें देशहिताचीं कामें करण्यासाठीं डेक्कनसभा या नांवाची एक संस्था स्थापिली. या सभेनें देशहिताची बरीच कामगिरी केली. तरीपण एकेकाळीं सार्वजनिक सभेला जें महत्त्व, जो जोम व जी धडाडी होती ती या सभेंत किंवा हल्लींच्या अवशिष्ट सार्वजनिक सभेंत मुळींच दिसून येत नाहीं. याचें कारण एकीची बेकी झाली हेंच होय.

( ८ ) **डेक्कन लिबरल क्लब**:—डेक्कन सभेच्या विस्तृत जागेंत व इमारतींत महाराष्ट्रांतील नेमस्त पक्षाचा हा क्लब आहे. या क्लबामार्फत पुष्कळ उत्तम व्याख्यानें होत असतात.

**( ९ ) चित्रशाळा स्टीम प्रेसः**—कै० श्री० विष्णशास्त्रि यांच्या यशस्वी हातानें ही संस्था स्थापलेली आहे तेव्हां ही कशी असेल व हिची किती वाढ झाला असेल हें सांगावयासच नको. या ठिकाणीं हिंदु पौराणिक देवतांचीं, ऐतिहासिक प्रसिद्ध पुरुषांचीं व स्त्रियांचीं, व आजकालच्या सुप्रसिद्ध देशसेवकांचीं उत्तम चित्रें तयार होतात व तीं फार माफक किंमतींन विकलीं जातात. या छापखान्यांत शिळेवरचें व टैपावरचें काम फार चांगलें होतें. मराठी भाषेंत अतिशय नांवारूपास आलेलें 'चित्रमय जगत्' या नांवाचें मासिक पुस्तक याच छापखान्यांत छापून प्रसिद्ध होतें.

**( १० ) डेकन प्रिंटिंग वर्क्सः**—ही संस्था चित्रशाळेप्रमाणेंच उत्तम शिळाप्रेसवरचें काम छापते, व शिवाय येथें फोटोझिंको प्रोसेसनें सुंदर चित्रांचे ठसेही तयार करून मिळतात.

**( ११ ) नाथीबाई ठाकरसी गर्ल्स हायस्कूलः**—ही नमुनेदार मुलींची शाळा श्री. प्रो. धों. के. कर्वे यांनीं महत्प्रयत्नानें स्थापन केली आहे. हल्लींच्या शिक्षण क्रमांतील दोष काढून टाकून, अनवश्यक विषयांस चाट देऊन व अत्यंत उपयुक्त विषयांची भर घालून एक नवीन शिक्षणक्रम प्रो. कर्वे व त्यांचे सहायक यांनीं तयार केला व त्या शिक्षण क्रमाला अनुसरून हिंगणे नांवाच्या पुण्याजवळच्या गांवीं एक नवीन 'स्त्रियांची पाठशाळा' म्हणजे युनिव्हर्सिटी स्थापन केली. त्याच पाठशाळेस जोडलेली ही कन्याशाळा आहे. या शाळेंत उत्तम विद्वान् शिक्षक व शिक्षका नवीन निर्दोष शिक्षणक्रमाअन्वयें उत्तम शिक्षण देत असतात. कै० सर विठ्ठलदास ठाकरसी या उदार धनिक देशहितचिंतकानें या कर्वे विद्यापीठास नुकतीच १५ लक्ष रुपयांची देणगी इ० स० १९२० सालीं दिली. हे त्यांचे उपकार स्मरून त्यांच्या सुशीलव पूज्य मातुश्री श्री. नाथीबाई ठाकरसी यांचें नांव या विद्यापीठाला व या शाळेला दिलेलें आहे. या संस्थेची सारखी भरभराट होत आहे.

( १२ ) **पुणें सेवासदनः**--ह्या संस्थेची स्थापना इ० स० १९०९ या वर्षाच्या आरंभीं झाली. ही संस्था स्थापन करण्यांत मुख्य उद्देश हिंदी मुली, व हिंदी प्रौढ स्त्रिया यांना सुशील बनविणारें व सर्व तऱ्हेच्या राष्ट्रकार्यांत स्वदेशबंधूंना मदत करण्यास समर्थ करणारें शिक्षण द्यावें हा आहे. ही संस्था उघडली तेव्हां तींत फक्त वीस मुली शिकत होत्या, व तेव्हां रोज फक्त २ तास शिक्षण देण्यांत येत असे. ही संस्था आरंभीं अगदीं अल्प प्रमाणावर सुरू झाली, परंतु पुढें संस्थेचा उत्तरोत्तर सतत उत्कर्षच होत गेला. तसेंच हा उत्कर्ष ज्या धोरणानें होत गेला तें बरेंच निर्दोष व थोर थोर मंडळीस संमत असून पूर्णपणें व्यावहारिक स्वरूपाचें व स्त्रीसमाजाला फार उपयुक्त असें आहे, कारण त्यायोगें आपल्या आयुष्यक्रमांतील अवश्य तीं कर्तव्यें बजावण्यास स्त्रियांना मदत होते. जी ही संस्था आरंभीं अवघ्या वीस विद्यार्थिनींची होती, तींत आज दीडहजार विद्यार्थिनी शिकत आहेत. ह्या संस्थेंत आरंभीं फक्त दोनच वर्ग होते. तेव्हां संस्थेला स्वतःची इमारत नसल्यामुळें ती श्री—रमाबाई रानडे यांच्या वाड्यांत शुक्रवार पेठेंत होती. हल्लीं या संस्थेंत एकंदर दीडहजार विद्यार्थिनी आहेत व एकंदर ३६ वर्ग आहेत. हल्लीं या संस्थेंतील या शिक्षण कार्याचे कामीं वर्षाला ३५ पासून ३६ हजार रुपये खर्च होत आहे. या संस्थेचें हल्लीं फीमेल ट्रेनिंग कॉलेज आहे. त्यांत ट्रेनिंग कॉलेजच्या तीनही वर्षांचा अभ्यास करून घेण्यांत येतो. शिवाय लहान मुलींना मराठी सहा यत्तांचें शिक्षण देण्याकरितां प्रॅक्टिसिंगस्कूल आहे. प्रौढ स्त्रियांना हुन्नर शिक्षण देणारीही शाखा येथें आहे. त्यांत शिवण काम, कशिदा काम, झीग काम, कापड विणण्याचें काम, हात मोजे विणण्याचें काम, तुण काम, कलाबतूचें काम, लोंकरीचें काम वगैरे कामांचें शिक्षण दिलें जातें. याशिवाय बाजाच्या पेटीच्या शिक्षणाचे व गायन शिक्षणाचेही वर्ग येथें चालू आहेत. शिवाय या संस्थेंत इंग्रजी भाषा शिकविण्याचे वर्ग आहेत. त्यांत इंग्रजींत ५ व्या रीडर पर्यंत शिकविण्यांत येतें. या शिवाय नर्सिंग व मिडवाइफी म्हणजे

नर्स होण्याचें व सुइण कामाचे शिक्षणाचीही या संस्थे मार्फत सोय करण्यांत आली आहे. बाहेर गांवच्या विद्यार्थिनींस रहाण्यासाठीं तीन वसति गृहें या संस्थेमार्फत काढलेलीं आहेत. त्यांपैकीं एक मेडिकल स्कूल मधें डॉकटर्णी, नर्सेस व सुइणी होणाऱ्या विद्यार्थिनींसाठीं रास्ता पेठेंत त्यांच्या मेडिकल स्कूल जवळ आहे. अशा तऱ्हेनें ज्या स्त्रियांना स्वतःचें पोट स्वतःच भरावयाचें आहे अशा स्त्रियांना त्यांच्या आवडीप्रमाणें शिकवून ट्रेंड शिक्षकिणी, डॉक्टरणी, नर्सेस किंवा मिडसुइणीज बनवून उत्तम तऱ्हेनें स्वतःचें व स्वतःवर अवलंबून असणाऱ्यांचें पोट भरण्यास समर्थ करण्यांत येतें. ज्या या संस्थेची आरंभीं एकही इमारत नव्हती, तिचे आज मोठ मोठे तीन वाडे आहेत, तरी देखील तें या संस्थेच्या वाढत्या विस्तारास पुरेसे नाहींत. या संस्थेस थोर धनिक, संस्थानिक, बडे अधिकारी व सामान्य जन यांची मदत होत आहे यामुळें स्त्रीशिक्षणाचें महत्त्वाचें राष्ट्रकार्य या संस्थेकडून उत्तम तऱ्हेनें पार पडत आहे.

---

# गणेश पेठ.

श्री गणेश या देवाचें नांव या पेठेला दिलेलें आहे ही पेठ श्रीमंत सवाई माधवराव पेशवे यांचे कारकीर्दीत वसविण्यांत आली. या पेठेंतील घरें अगदीं भिकार आहेत. या पेठेचें क्षेत्रफळ १५५००० चौरसवार आहे आणि लोकसंख्या ४४८६ आहे. ही पेठ श्री सरदार जिवाजीपंत खासगीवालें यांनीं वसविली. या पेठेंत मुख्य व्यापार इमारती लांकडांचा. दुसरा फारसा व्यापार पेठेंत नाहीं. या पेठेंतील रस्ते चांगले रुंद आहेत व गल्ल्या देखील इतर पेठांपेक्षां चांगल्या सरळ व स्वच्छ आहेत.

**या पेठेंतील प्रसिद्ध स्थळें:—**

(१) डुल्या मारुतीचें देऊळ (२) आर्यभूषण नाटकगृह. व (३) दगडी नागोबा,

(१) **डुल्या मारुतीचें देऊळः—**हें देऊळ नागझरी जवळ आहे. जुन्या पुण्याच्या पूर्व दिशेस राहून त्या बाजूनें पुणें शहराचें रक्षण करण्याचें काम हे मारुति देव पूर्वापार करीत आले आहेत. शहरच्या ग्रामदेवतांपैकीं ही देवता आहे. या देवाला डुल्या मारुती असें नांव पडण्याचें कारण असें सांगतात कीं जेव्हां इ० स० १७६१ सालीं हिंदुस्तानच्या उत्तरेस पानपतच्या समरांगणावर मराठे व अफगाण यांच्या मध्यें भयंकर युद्ध चालू होतें, तेव्हां एक दिवस या मारुतीची मूर्ति अतिशय हेलकावे घेऊं लागली. तेव्हांच लोकांना वाटलें कीं मारुतीराय दुःखानें डुलत आहेत तेव्हां पानपतावर कांहीं ठीक चिन्ह दिसत नाहीं, हा अपशकून आहे असें त्याच वेळेस लोकांस वाटलें, व मागाहून मराठ्यांचा पूर्ण पराभव व भयंकर कत्तल झालेली जेव्हां लोकांच्या कानीं आली, तेव्हां पूर्वींचें

मारुति देवाचें दुःखानें डुलणें त्यांना आठवलें, व त्या वेळेपासून त्या देवाला डुल्या मारुती असें म्हणूं लागले. त्यावेळेपासून लोकांची या मारुतीवर अतीशय भक्ति जडली. हें देऊळ नारो अनंत नातृ यांनीं बांधलें, व देवळा पुढचा सभामंडप एका रखमाबाई नांवाच्या भाविक बाईनीं इ० स० १७८० सालीं बांधला. पर्वतीसंस्थानांतून दरमहा चार रुपये या देवळाला मिळतात.

( २ ) **आर्यभूषण नाटकगृहः**—या ठिकाणीं पेशवाईत धर्मशाळा होती व प्रवाश्यांच्या सोयीसाठीं या धर्मशाळेजवळ एक पाण्याचा हौदही बांधलेला होता. याच ठिकाणीं भोजन बहाद्दर बाजीराव यांनीं जेवणावळी घालण्याचा सपाटा ठेवला होता. पेशवाई बुडाल्यावर ती इमारत इंग्रज सरकारच्या ताब्यांत आली. नंतर इ० स० १८२० सालीं त्यावेळचे पुण्याचे कलेक्टर मि० रॉबर्टसन यांनीं आपले अकौंटट मि० हौस्टन यांना ही इमारत रहाण्यास दिली. ती इमारत इ० स० १८७४ पर्यंत सदरहू हौस्टन साहेब यांच्या विधवेकडे होती. त्या वर्षीं त्या बाईपासून एक धनिक रसिकानें ती इमारत १०५०० रुपयांस विकत घेतली व आणखी सातआठ हजार रुपये त्या इमारतीवर खर्च करून त्याचें एक नाटकगृह बनाविलें. या नाटकगृहामुळें रंगेल रसिक जन व नाटक कंपन्या यांची चांगली सोय झाली, व शनवार व बुधवार या दिवशीं हें नाटकगृह प्रेक्षकांनीं गजबजून जाऊं लागलें. परंतु पुढें किर्लोस्कर नाटक गृह जन्माला आलें, यामुळें या नाटकगृहाची भरभराट कमी झाली व प्रेक्षकगण व नामांकित नाटक मंडळ्या किर्लोस्कर नाटकगृहाकडे वळल्या. या बिचाऱ्या जुन्या आर्यभूषण थिएटराला हल्लीं कलगी तुऱ्याचे तमासगिर आपल्या तमाशांनीं व चुरशींच्या लावण्यांनीं भूषवीत आहेत. हा महिमा काळाचा.

# वेताळ पेठ.

वेताळ पेठेचें मुळचें नांव गुरुवार पेठ. या पेठेला वेताळ पेठ हें नांव या पेठेंत वेताळाचें देऊळ बांधल्यानंतर पडलें. ही पेठ जिवाजीपंत खासगीवाले या सरदारांनीं वसाविली. या पेठेचें क्षेत्रफळ १९५००० चौरस यार्ड आहे. ही पेठ नानासाहेब पेशव्यांच्या वेळीं वसाविण्यांत आली. पुण्यांतील प्रसिद्ध सोनार या पेठेंत रहातात. या पेठेची वस्ती ५८७१ आहे. या पेठेंत पहाण्यासारखीं स्थळें ( १ ) वेताळाचें देऊळ, व ( २ ) पारसनाथाचें देऊळ, हीं आहेत.

**( १ ) वेताळाचें देऊळः**—वेताळ म्हणजे भुतांचा राजा. हें देऊळ दिसण्यांत अगदीं साधें आहे. या देवळात वेताळांच्या पादुका एका बाजूस आहेत. एका कोनाड्यांत नंदादीप जळत असतो. या देवळांत वेताळाची भली थोरली ओबड धोबड तांबडी मूर्ति आहे. त्याला कल्लेदार मिशा आहेत, व सर्व अंगावर शेंदूराचीं पुटेंच्या पुटें दिलेलीं आहेत. त्या मूर्तीला बटबटीत डोळे आहेत. समोर एक नंदा आहे. या देवळांत एक घंटा आहे ती या देवाला पेशवे सरकारनें दिली. पेशवे सरकारनें तोफा ओततांना या देवाला असा नवस केला होता कीं जर आमच्या तोफा उत्तम झाल्या तर एक मोठी घंटा तुझ्या देवळांत बांधू. तोफा उत्तम झाल्यावर पेशव्यांनीं सदरहू घंटा येथें बांधली. वेताळाचा मुख्य दिवस शुक्रवार आहे ,यामुळें या दिवशीं येथें फार लोक येतात. नवस फेडण्यासाठीं या देवापुढें बकरें बळी देतात, पण कोंबडे देत नाहींत. या देवळाचे भगत मुख्यतः पहिलवान् व जादू करणारे व मांत्रिक हे आहेत.

**( २ ) पारसनाथाचें देऊळः**—श्रीमंत पेशवे सरकार यांचे मनांत हमरस्त्यावर जैन धर्मीचें हें पारसनाथांचें देऊळ असूं नये असें होतें. म्हणून त्यांनीं या देवळास पुष्कळ हरकती घेतल्या; परंतु जैन लोकांच्य

चिकाटीमुळें, व श्री. शंकराचार्य यांच्या सहानुभूतिपूर्ण परवानगीमुळें जैन लोकांना हें देऊळ येथें बांधतां आलें. तरी देखील या देवळाचा व जैन धर्माचा संबंध हिंदू लोकांशीं येऊं देणार नाहीं; अशी जैनांपासून पेशवेसरकारांनीं हमी घेतली. त्याप्रमाणें हें मंदीर कडेकोट बंदोबस्ताचें व तटबंदीचें बांधलें आहे. यामुळें हिंदु लोकांच्या तें सहज नजरेस पडावयाचें नाहीं.

या पेठेंत नाना शंकरशेट, केशवजी नाइक, त्र्यंबकजी वेलजी, व चौधरी या श्रीमंत गृहस्थांचे सुंदर वाडे आहेत. चौधरी याचे वाड्यांत कोंढव्याहून बांधून आणलेला स्वतंत्र नळ आहे.

---

# रास्त्याची पेठ.

या पेठेचें मूळचें नांव शिवपुरी असें होतें. शिवपुरी असें नांव पडण्याचें कारण श्रीमंत आनंदराव लक्ष्मण रास्ते म्हणजे या पेठेचे वसाहत करणारे यांनीं या पेठेंत एक सुंदर शिवमंदिर बांधलें होतें. त्या शिवमंदिरावरून या पेठेला शिवपुरी हें नांव पडलें. रास्ते हे पेशवे यांचे घोडेस्वारावरचे वंशपरंपरा मुख्य अधिकारी होते. ही पेठ वसविणारे श्रीमत रास्ते यांच्या घराण्याविषयीं थोडक्यांत हकीगत अशी आहे:—ह्या घराण्याचे मूळपुरुष भिकाजी शामराज व सदाशिव शामराज असे होते. हे दोघे बंधू सातारा येथें श्री. छत्रपती शाहूमहाराज यांचेजवळ रहात असत. त्यांना सालीना ५२०० रुपयांची नेमणूक होती. या बंधूंपैकीं सदाशिव शामराज हे शाहूमहाराजांचे जवळ सातारा येथेंच शाहूमहाराजांचें आज्ञेवरून रहात असत व त्यांचे बंधू भिकाजी शामराव ह्यांना शाहूमहाराजांनीं वाईस ठेवून दिलें होतें, व तेथें त्यांना एक वाडाही बांधून दिला होता. आतां या बंधूंचें मूळचें आडनांव कांहीं रास्ते नव्हतें. यांचें मूळचें आडनांव गोखले होतें. हे दोघे बंधू पूर्वी व्यापार करीत असत. त्यांचा व्यापार ते अगदीं प्रामाणिकपणानें व रास्तपणें करीत यामुळें त्यांचें मूळचें नांव जाऊन त्यांच्या चांगल्या गुणावरून त्यांना रास्ते हें आडनांव प्राप्त झालें. तिसरे पेशवे बाळाजी बाजीराव उर्फ नानासाहेब यांचें लग्न व्हावयाचें होतें. तेव्हां श्री. छत्रपती शाहूमहाराज यांनीं भिकाजीपंत रास्ते यांची वडील मुलगी गोपिकाबाई हिचें नानासाहेब पेशव्यांशीं लग्न करून दिलें. त्या लग्नसमारंभासाठीं स्वतः शाहूमहाराज वाईस गेले होते, व त्यांनीं त्या लग्नाप्रीत्यर्थ पुष्कळ खर्च केला ( ७३० ). भिकाजीपंत रास्ते यांचें सातही

मुलगे अतिशय शूर होते, यामुळे रास्त्यांचें नांव सर्व महाराष्ट्रांत दुमदुमू लागलें. श्रीमंत रास्ते हे फार धार्मिक व गरीबाचे कनवाळू होते. यामुळें त्यांनीं लाखों रुपये खर्च करून गरीबांसाठीं महाराष्ट्रांत ठिकठिकाणीं धर्मशाळा, देवालयें, घाट, अन्नछत्रें व पाणपोया बांधल्या. रास्त्यांनीं ही पेठ इ० स० १७८९ सालीं वसविली. व त्याचसालीं रास्ते यांनीं आपला प्रचंड वाडा बांधण्यास सुरवात केली. हा वाडा नऊ वर्षांनीं पुरा झाला. हा वाडा बांधण्यास नऊलक्ष रुपये लागले. व स्वतंत्र नळ बांधून वाड्यांत पाणी आणलें. त्याला दोन लक्ष रुपये लागले. हा वाडा बांधून सुमारें दीडशेंच्या जवळ वर्षे झालीं आहेत. तरी त्याचें काम अतिशय मजबूत असल्यामुळें तो अगदीं उत्तम स्थितींत आहे. नाहींतर हल्लींचे वाडे यंदां बांधला कीं पुढल्यावर्षीं रिपेअरींच्या खर्चास सुरवात व्हावयाची. असो; या वाड्याचें बहुतेक काम लाकडी आहे. ह्या वाड्याला दोन चौक आहेत. हा वाडा पुण्यांतील सर्व वाड्यांत सहज पहिला नंबर पटकावील. या वाड्या भोंवतीं उंच व मोठा तट आहे. या वाड्याचा दिंडीदरवाजा खूप मोठा व सुंदर आहे. व त्यावर दुमजली इमारत आहे. सभोंवतालच्या कोटाच्या मध्यभागीं मुख्य तीन मजली वाडा आहे, त्याला दोन मोठे चौक आहेत. वाड्याच्या लगत एक मनोहर बगीचा आहे व त्या बागेंत एक महादेवाचें मंदीर आहे. या देवळाला जोडून एक श्रीरामाचें मंदिर इ० स० १८८२ सालीं श्रीमंत उमाबाईसाहेब रास्ते यांनीं पुष्कळ पैसा खर्च करून बांधलें. ह्यांत ज्या मूर्ति आहेत तशा मनोहर मूर्ति महाराष्ट्रांत दुसरीकडे क्वचितच आढळतील. पुणें शहर पहावयास येणारानें हें राममंदीर व त्यांतील अत्यंत मनोहर मूर्ति व त्याचे जवळच असलेल्या दत्ताच्या पादुका पाहिल्याशिवाय राहूं नये. या पेठेंत श्रावण महिन्यांत शिराळ (श्रीपाळ) शेटची मोठी यात्रा भरत असते. या पेठेची वस्ती भराभर वाढत चालली आहे याचें कारण सरकारी बहुतेक कामगार लोकांस ही पेठ रहाण्यास फार सोइस्कर आहे, स्टेशन अगदीं नजीक आहे, मोठमोठालीं सरकारी ऑफिसेंही येथून जवळ आहेत, शिवाय शनवार, नारायण, कसबा वगैरे पेठांप्रमाणें ह्या पेठेची

इथा कोंदट नाहीं, व येथील वस्तीही दाट व अस्वच्छ नाहीं. खरोखर रास्त्याचे पेठे सारखी हवाशीर, निरोगी, स्वच्छ व सर्व तऱ्हेनें सोइवार अशी या सर्व पुणें शहरांत दुसरी पेठ नाहीं. यामुळें सर्व धर्मांचे व सर्व जातींचे लोक या पेठेंत मोठ्या आनंदानें रहातात या पेठेंतील एका भागांत मुदलियार वगैरे मद्रासी लोकांचा इतका भरणा आहे कीं या भागाला मद्रपुरी अथवा मद्रपट्टण असें नांव दिल्यास फार चांगलें होईल. इस्रायल ज्यू लोकांचीही या पेठेंत पुष्कळ वस्ती आहे. पेनशनर लोकही याच पेठेंत खचून भरले आहेत. गेल्या पन्नास वर्षांत या पेठेची फारच भरभराट झाली आहे. जनमन रंजनासाठीं मनोहर अपोलो सिनेमा रोज तीन तीन प्रोग्राम करीत असतो व लोकही आपल्या आगमनानें व तिकीट खरेदीनें सिनेमा कंपनीला उदार आश्रय देऊन त्यांच्या मनोहर देखाव्यांचें चीज करितात. या पेठेंत श्रावण महिन्यांत शिराळशेटची मोठी जत्रा भरते. हे शिराळशेट सुमारें सवाशें वर्षांमागें होऊन गेले. हे लिंगाइत जातीचे होते व फार मोठे सज्जन सावकार होते.

———

# सोमवार पेठ.

या पेठेचें मूळचें नांव शहापुरा. या पेठेचें क्षेत्रफळ ५४५००० चौरस यार्ड आहे व लोक संख्या ५२३४ आहे. या पेठेंतील मुख्य वस्ती श्रीमंत गोसावी सावकार कोष्टी या लोकांची आहे. ही पेठ हल्लीं बरीच खालावली आहे कारण येथील सावकार लोकांचा व्यापार सरकारी बँकांकडे गेल्यामुळें ते लोक पूर्वी सारखे श्रीमंत राहिले नाहींत. या पेठेंत मुख्य पहाण्यासारखीं ठिकाणें दोन एक नागेश्वराचें देऊळ व दुसरें श्रीविष्णूचें देऊळ.

(१) **नागेश्वराचें देऊळः**—हें देऊळ अतिशय पुरातन आहे. याच्या बांध कामाच्या घाटणी वरून हें इ० स० च्या सोळाव्या शतकांत बांधलें असावें असें वाटतें. आबा शाळूकर या नांवाचें एक नाना फडणीस यांचे मित्र होते. त्यांनीं या देवळाचा जीर्णोद्धार केला; त्यास त्यांना एक लक्ष रुपये लागले. इ० स० १८७८ सालीं रघुनाथराव औरंगाबादकर यांनीं या देवळाची आणखी सुधारणा केली व देवळांत व बाहेर सार्वजनिक हौद बांधले. पर्वती संस्थानाकडून या देवळास महिना सहा रुपये मिळतात.

(२) **नरपतगिराचें मंदीरः**—हें श्रीमंत नरपतगीर गोसावी यांनीं ५०००० रुपये खर्चून बांधलें. या देवळांत पाण्याचा एक हौद व एक कारंजें आहे.

(३) **श्री विष्णूचें देऊळः**—हें देऊळ सोमवार पेठेंतील गोसावीपुरा या नांवाच्या भागांत आहे. हें बाबा नरपतगीर गुरु कासीगीर गोसावी यांनीं इ० स० १८४६ त बांधलें. या कामीं त्यांना १३०००० रुपये खर्च आला. हे उदार गोसावी इ० स० १८५९ सालीं मरण पावले.

या बोरांनी एक धर्मशाळाही बांधली आहे. गोसावी पुऱ्यांतील पाण्याचा तुटवडा नाहींसा करण्यासाठीं या बोरांनीं, कात्रजच्या नळाची एक शाखा इकडे आणून या देवळांत एक हौद बांधून त्यांत तें पाणी सोडलें आहे. हें पाणी आणण्याचें काम सारखें चार वर्षे म्हणजे इ० स० १८४६ पासून इ० स० १८५० पर्यंत चाललें होतें. या देवळांत श्री विष्णु व श्री लक्ष्मी यांच्या सुंदर मूर्ती स्थापिल्या आहेत. बावा नरपतगीर गोसावी यांनीं सालीना ५०० रुपयांच्या उत्पन्नाच्या जमिनी या देवळाच्या व धर्मशाळेच्या खर्चासाठीं लावून दिलेल्या आहेत.

---

## न्याहाल पेठ.

---

ही पेठ लहानच आहे पण अत्यंत निरोगी आहे. या पेठेचें क्षेत्रफळ १०५००० चौरस यार्ड आहे व लोकसंख्या सुमारें दीड हजार आहे. ह्या पेठेला न्याहाल पेठ असें नांव पडण्याचें कारण श्रीमंत सरदार खासगीवाले यांनीं आपला प्रामाणिक नोकर न्याहालचंद याचें स्मरणार्थ ही पेठ बांधली. व त्याचें नांव या पेठेला दिलें. या पेठेंत श्रीमंत प्रभू लोकांचीं बरींच घरें आहेत व शिवाय बरेच सुखवस्तू पेन्शनरही या पेठेंत राहतात. लष्कराकडे, व स्टेशनकडे जाणारे मोठे रस्ते या पेठेतून जातात. या पेठेंत गरीब साळी व शिंपी लोकांचीं एक मजली घरें बरींच आहेत.

# नानाची पेठ.

ही पेठ सुप्रसिद्ध राष्ट्रकार्य धुरंधर नाना फडणीस यांनीं इ० स० १७९१ सालीं वसविली. या पेठेचें क्षेत्रफळ ५२५००० चौरस यार्ड आहे व लोक संख्या १०४४३ आहे. या पेठेंत घाऊक धान्याचे व्यापारी राहतात. हे बहुतेक श्रीमंत मारवाडी व गुजराथी आहेत. या पेठेंत बैल-गाड्यांचे मोठेमोठे अड्डे आहेत. रेल्वे आल्यापासून बैल गाड्यांस येथें पुष्कळ काम मिळूं लागलें, यामुळें या पेठेंत उघड्या जागांवर शेंकडों बैलगाड्या येतात. या उघड्याजागांचे मालक या गाडीवानांकडून चांगलें भुइभाडें वसूल करतात. व शिवाय त्या बैलगाडीवाल्यांना काम मिळवून देण्यासाठीं त्यांचे पासून दलाली मिळवितात. या पेठेंतून एक मोठा रस्ता लष्कराकडे जातो. ही पेठ लष्कराच्या लगत आहे यामुळें लष्करांत काम करणारे मोतद्दार वगैरे लोक या पेठेंत राहून लष्करांत कामाला जातात. या पेठेंत मुख्य सुप्रसिद्ध स्थळें पारशी लोकांची अग्यारी, घोडेपीर, व निवडुंग्या विठोबा हीं आहेत.

( १ ) **अग्यारीः**—हल्लीं अग्यारी आहे त्या ठिकाणीं प्राचीन काळीं नगरशेट वानवळे यांची मोठी बाग होती. ती बाग सोराबजी रतनजी या नांवाच्या एका श्रीमंत पारशी गृहस्थानें विकत घेतली व त्या ठिकाणीं पारशी लोकांची देवता जो अग्निनारायण याची पूजा करण्याकरितां अग्यारी अथवा अग्नीचें देऊळ इ० स० १८२४ सालीं बांधलें. दस्तुर नसरवानजी जमास्पजी यांनीं या देवळाचा जीर्णोद्धार इ० स० १८७७ सालीं केला. या देवळावर हल्लीं एक घड्याळाचा मनोरा जोडला आहे.

( २ ) **घोडेपीरः**—घोडेपीर म्हणजे घोड्यावरचा ताबूत. हा ताबूत घोड्यावर बसविलेला असतो याचें कारण या ताबूताचा मूळ स्थापक हा एक घोडेस्वार होता. मनुष्य आपण जसा स्वतः असतो तसा तो देवास कल्पितो हा नियम सर्वत्र लागू पडतो

सोय झाली व यामुळें प्रत्यहीं त्या उदारस्थूल भाटिया लोकांना शेंकडों मुखांतून आशीर्वाद मिळत आहेत.

असो आतां पर्वतीच्या पूर्व इतिहासाकडे वळूं. पर्वती हें प्रसिद्ध रमणीय व हवाशीर ठिकाण शहर सपाटी पासून २६१ फूट उंच अशा टेंकडीवर आहे. हें ठिकाण आरंभीं कसें प्रसिद्ध झालें या विषयीं दोन दंतकथा आहेत.

**पहिली दंतकथा**—:श्रीमंत छत्रपती शाहूमहाराज म्हणजे मराठी राज्याचे संस्थापक श्रीशिवाजी महाराज यांचे नातु व संभाजी महाराजांचे ज्येष्ठ चिरंजीव यांनीं मरणसमयीं आपले प्रिय व कर्तबगार पेशवे बाळाजी बाजीराव उर्फ नानासाहेब यांना आपल्या जवळ बोलावलें व आज्ञा केली कीं हें मराठी राज्य मी तुमच्या हवालीं करतों. शिवाजी महाराजांच्या गादीचा व वंशजाचा आदरानें सन्मान ठेवून आपण दक्षतेनें मराठी राज्याचा प्रतिपाल व संवर्धन करावें. ती आज्ञा स्वामिभक्त नानासाहेब पेशवे यांनीं शिरसावंद्य करून शिवाजी महाराजांच्या पादुका घेऊन ते पुण्यास आले व त्यांनीं त्या पादुका पर्वतीच्या टेंकडीवर स्थापिल्या व त्यावर सुंदर मंदिर बांधलें. नित्यनियमानें सकाळीं नानासाहेब पेशवे शिवछत्रपतींच्या पादुकांचें पर्वतीवर जाऊन दर्शन घेत व त्या थोर अवतारी पुरुषाच्या पुण्याईच्या जोरावर कारभारास आरंभ करीत. हा परिपाठ पुढील पेशव्यांनीं अव्याहत चालू ठेवला होता. पण शेवटचे बाजीराव पडले फार शहाणे. त्यांनीं विचार केला कीं आपण ब्राह्मण, शिवाजीमहाराज मराठे. तेव्हां त्यांस आपण नमस्कार करणें योग्य नाहीं. असा पोक्त विचार करून त्यांनीं त्या पादुकांच्या जागीं शंकराच्या लिंगाची स्थापना केली. ‘ विनाशकाले विपरीत बुद्धिः ’ म्हणतात ती हीच. जोंपर्यंत थोर अवतारी पुरुष छत्रपति शिवाजी महाराज यांना पेशव्यांकडून मान मिळत होता, तोंपर्यंत मराठी राज्याची भरभराट होत होती. शेवटच्या बाजीरावांनीं मराठी राज्याचें संस्थापक शिवाजी महाराज यांचा वर लिहिल्याप्रमाणें अपमान केल्यावरे मराठी राज्य कां बुडणार नाहीं ? आणि हें

**निवडुंग्या विठोबाः**—या विठोबास निवडुंग्या असें विशेषण मिळण्याचें कारण याची येथील मूर्ति निवडुंगाच्या झाडींत सांपडली हें होय. आरंभीं या देवाचें देऊळ अगदीं लहान होतें. इ० स० १८३० सालीं एक भक्तिवान् श्रीमंत गृहस्थ पुरुषोत्तम अंबादास गुजराथी यांनीं हल्लींचें मोठें देऊळ बांधलें त्यास त्यांना रु. ३०००० खर्च आला. त्यांनीं या देवळास सालीना ५०० रु. उत्पन्न करून दिलें आहे. नानाचे पेठेंत सर्व जातींचें संमेलन झालें आहे. त्यांत भाविक ख्रिस्ती, महंमदी व ज्यू व हिंदु असे निरनिराळ्या धर्मांचे लोक आहेत.

---

# भवानी पेठ.

ही पेठ श्रीमंत सवाई माधवराव यांचे कारकार्दींत नानाफडणीस यांनीं मोठमोठ्या व्यापाऱ्यांस रहाण्यासाठीं वसविली. हिचें मूळचें नांव बोरबन असें होतें. देशमुखांनीं या पेठेंत भवानी मातेचें देऊळ बांधलें. तेव्हांपासून या पेठेला भवानी पेठ असें म्हणूं लागले. या पेठेचें क्षेत्रफळ १२३५००० चौरस यार्ड आहे व लोकसंख्या सुमारें १००११ आहे. भवानी पेठेंत मुख्यवस्ती गळीताच्या धान्याचे व्यापारी व इतर मोठमोठे गुजराथी व मारवाडी व्यापाऱ्यांची आहे. या पेठेंत अडतेलोकही पुष्कळ आहेत. शिवाय पुष्कळ श्रीमंत पारशीलोकही या पेठेंत रहातात. या पेठेंत सुप्रसिद्ध स्थळें म्हटलीं म्हणजे भवानीचें देऊळ व विठोबाचें देऊळ हीं होत.

( १ ) **भवानीचें देऊळ**:—हें देऊळ आरंभीं सार्वजनिक वर्गणी करून इ० स० १७६० सालीं बांधलें. तेव्हां त्याला ५००० रुपये खर्च आला.

या देवळाला जोडून एक धर्मशाळाही बांधलेली आहे. या देवळाला कायमचें उत्पन्न नाहीं. देवीपुढें भक्तजन ठेवतील तेंच कायतें उत्पन्न. अश्विन महिन्यांत नवरात्राचे नऊ दिवस येथें मोठी जत्रा भरते व उत्सव होतो. ब्राम्हणांमध्यें या देवीचे भक्त फारसे नाहींत. ब्राम्हणेतर जातींत या देवीचे शेंकडों भक्त आहेत. ते देवीला नवस करतात व देवी नवसास पावली म्हणजे देवीपुढें कोंबडीं व बकरीं बळी देतात व अशा रीतीनें आपला नवस फेडतात.

---

## मुजफरजंग पेठ.

या पेठेचें क्षेत्रफळ २३००० चौरस यार्ड आहे, व लोकसंख्या सुमारें शेंसवाशें आहे. श्रीमंत घोरपडे यांचा मुजफरजंग या नांवाचा एक सेनापति होता. त्याचे नांवानें ही पेठ वसविली आहे.

---

## गंज पेठ.

या पेठेला गंज पेठ असें नांव पडण्याचें कारण या पेठेंत मिठाचे मोठमोठे गंज पडलेले असतात हें होय. या पेठेंत साळी माळी यांची मुख्य वस्ती आहे व लोक संख्या सुमारें ५८९१ आहे. या पेठेचें क्षेत्रफळ ४०५०८० चौरस यार्ड आहे. या पेठेंत पहाण्यासारखें कांहीं नाहीं. या पेठेंतील हवा चांगली आहे, पण पाणी जरा बातावेताचें आहे.

---

## घोरपडे पेठ.

—— (०) ——

ही पेठ सवाई माधवराव पेशवे यांचे कारकीर्दींत मालोजी राजे भोसले घोरपडे म्हणजे जरीपटका हें निशाण सैन्याचे वर फडकवणारे यांनीं वसविली. या पेठेंत लोकसंख्या सुमारें १३५४ आहे. पहिल्यानें या पेठेंत घोरपड्यांच्या सैन्याचें ठाणें असे. हल्लीं या पेठेंत गरीब चांभार, महार, शेतकरी व गरीब मुसलमान लोक रहातात. सर्व पेठांत ही पेठ अत्यंत कंगाल आहे. या पेठेंतील बहुतेक घरें झोंपडीवजा आहेत. पाण्याचा पुरवठा बाताबेताचा आहे. या पेठेंत पूर्वीं श्री. घोरपडे यांचा भव्य वाडा होता पण तो आतां पडून गेला आहे. या पेठेंत पहाण्यासारखें कांहीं नाहीं.

---

## मंगळवार पेठ.

—— ... ——

या पेठेचें मूळचें नांव शाइस्तेपुरा. हें नांव शाइस्तेखान यांच्या नांवावरून या पेठेला पडलें. शाइस्तेखान हा अवरंगजेब बादशाहाच्या मावशीचा नवरा. याला अवरंगजेबानें शिवाजीवर पाठविलें होतें. इ० स० १६६२ त तो शिवाजीचा मोड करण्या करितां पुण्यास येऊन राहिला होता. त्यावेळीं ही पेठ त्यानें बहुतकरून आपल्या स्मरणार्थ वसविली असावी. या पेठेंतील बहुतेक घरें बैठींच आहेत. या पेठेंत वतनदार ब्राम्हणांचीं दोन घरें आहेत. मुख्य वस्ती हलालखोर, महार व मराठे या लोकांची आहे. सर्पण व कडबा यांच्या बाजाराकडे जाणारा व

जज्ज कोर्टाकडे जाणारा असे दोन मुख्य रस्ते या पेठेंतून गेले आहेत. एका काळीं ही पेठ म्हणजे शहरच्या मुख्य बाजाराचें ठिकाण होतें. गेल्या पाऊणशें वर्षांत या पेठेचा एक सारखा ऱ्हास होत गेला आहे. हल्लीं या पेठेंत फक्त सरपणाचा व गवत व कडब्याचा उघड्या मैदानावरचा बाजार कायतो शिल्लक राहिला आहे; व नाहीं म्हणावयास डाळीचीं दुकानें आहेत. हंगामाच्या दिवसांत रोज ५०० गाडी सरपण येथें येत असतें. पूर्वी या ठिकाणीं मोठमोठे भव्य वाडे होते, पण आतां कोठें कोठें त्या वाड्यांचीं पडकीं जोतीं मात्र दृष्टीस पडतात व या पेठेच्या पूर्वीच्या वैभवाची आठवण देतात. या पेठेची वस्ती हल्लीं ४२२४ आहे.

---

# भांबुर्डा पेठ.

या खेड्याची लोकसंख्या १८३६ आहे. हें मुठानदीच्या पूर्व किनाऱ्यावर आहे. लकडीपूल, दगडीपूल उर्फ धरण व लॉईडपूल या तीन पुलांनी हें खेडें पुण्याशीं जोडलें गेलें आहे. हें पुण्याच्या म्युनिसिपालिटीच्या हद्दींत व ताब्यांत आहे. लॉईडपूल नांवाचा एक मोठा पूल शनवार वाड्याच्या दिल्लीदरवाजाच्या समोर झाला आहे तो हें खेडें व पुणें यास संयुक्त करून सोडणार यांत बिलकुल संशय नाहीं. या भांबुर्ड्यांत दर बुधवारीं व रविवारीं गुरांचा मोठा बाजार भरतो. या खेड्याच्या हद्दींत पुष्कळ युरोपियनांचे बंगले, कॉलेजें व पांचाळेश्वराचें कोरींव प्रेक्षणीय देवालय आहे. १८०१ सनांत या खेड्यांतील एका घरीं विठोजी होळकर याला पकडून धाकटे बाजीराव यांनीं अत्यंत क्रूरपणानें व मूर्खपणानें हत्तीच्या पायांखालीं तुडवून ठार मारविलें. त्यामुळें त्याचे बंधु यशवंतराव होळकर यांनीं पुण्यावर स्वारी केली, पुणें लुटलें, बाजीराव पळत सुटले, ते वसईस जाऊन इंग्रज सरकारशीं सन १८०२ च्या डिसेंबरच्या ३० तारखेस तह करून आपलें स्वातंत्र्य वैभव व तेजस्विता गमावून बसले.

**पांचालेश्वर**:—हें देऊळ भांबुर्ड्या जवळ एका गुहेंत आहे. या देवळाचा असा चमत्कार आहे कीं आपण याच्या अगदीं जवळ जाई पर्यंत याचा आपणांस मागमूसही लागत नाहीं. अगदीं जवळ गेल्यावर सपाट जमिनीखालीं खडकांत खोदलेलें हें विशाळ भव्य व रमणीय देऊळ पाहून आपण आश्चर्यानें अगदीं थक्क होऊन जातों. हें श्रीशंकराचें देवालय आहे. याला खोदून काढलेले पुष्कळ खांब आहेत. हें देऊळ पांडवांनीं वनवासांत असतांना खोदून तयार केलें अशी दंतकथा आहे. या देवळांत कांहीं गोसावी रहातात.

**चतुःशृंगीचें देऊळः**—हें देऊळ पुण्यापासून सुमारें तीन मैलांवर आहे. हें एका टेंकडीवर आहे व या देवळास ८० पायऱ्या आहेत. या देवळाविषयीं अशी दंतकथा आहे कीं कोणी एक दुल्लभशेट नांवाचा श्रीमंत सावकार होता. त्यानेंच शिवराई हें नाणें १७८६ त पाडलें. तो दरवर्षीं नाशीक क्षेत्राजवळ असलेल्या सप्तशृंगी देवीच्या दर्शनास जात असे. सप्तशृंगी देवीचें देऊळ नाशकापासून सुमारें २० मैल दूर आहे. पुढें तो म्हातारा झाला तेव्हां त्याला इतक्या दूरचा प्रवास करवेना. तेव्हां सप्तशृंगी देवी त्याच्या स्वप्नांत आली व तिनें त्याला सांगितलें कीं ' भक्ता आतां तूं इतक्या दूरचा प्रवास करूं नकोस. तुझ्या पुण्याजवळ चतुर्शृंगीचा डोंगर आहे त्यावर मी तुझ्यासाठीं आलें आहें. तेथें येत जा व माझें दर्शन घे. हें देऊळ मूळचें अतिशय लहान होतें. पण हल्लीं भाविक भक्तांनीं या देवळा समोर एक सुंदर दिवाणखाना बांधला आहे व त्यांत एक वाव, एक मोठें थोरलें घड्याळ व एक मोठा आरसा ठेवला आहे, व एक धर्मशाळाही बांधली आहे. . अश्विन महिन्यांत नवरात्राची मोठी जत्रा ९ दिवस येथें भरत असते. त्यावेळीं हजारों लोक देवीच्या दर्शनास येतात, व वनभोजनाचें सौख्य अनुभवतात. नवरात्रांत या देवळांत होम होतो. या देवळाला पर्वती संस्थानांतून थोडें उत्पन्न आहे.

**गणेशखिंड गणपतीः**—हें गणपतीचें देऊळ चतुःशृंगीच्या टेंकडीच्या पायथ्याशीं आहे. हें देऊळ शिवराम बुवा चित्राव यांनीं बांधलें. माधवराव बर्वे नांवाच्या गृहस्थांनीं या देवळाचा सभामंडप बांधला. या देवळांतच पुजाऱ्याला रहाण्याची जागा आहे. या देवळांत एक चांगली विहीर आहे. हें देऊळ दोन टेंकड्यांमध्यें आहे. सरकारांतून या देवळाला दरमहा ५ रुपये मिळतात.

# पुण्याची पर्वती.

पुणे शहर अनेक गोष्टींविषयीं प्रसिद्ध आहे. तेथें अनेक संस्था व अनेक वाडे आहेत. पण पुण्याचें नांव घेतांच एकदम जर प्रामुख्यानें एक कोणची गोष्ट प्रत्येकाच्या लक्ष्यांत येत असेल तर ती पुण्याची पर्वती होय. तुम्हीं अशिक्षित असा का सुशिक्षित असा, तुम्ही हिंदु असा का हिंदुशिवाय इतर धर्माचे म्हणजे यहुदी, पारशी ख्रिस्ती किंवा मुसलमान असा, तुम्हीं पुरुष असा किंवा स्त्रिया असा, तुम्हीं सुधारक असा का उद्धारक असा, तुम्हा सर्वांना कोणत्याना कोणत्या तरी कारणानें आप-णाकडे ओढून घेणारी पर्वती ही एकच आहे. अहो उघडच आहे. संता-पानें लाल झालेल्या व जन्मांत तुझें तोंड पहाणार नाहीं अशी प्रतिज्ञा करून पाय आपटीत निघून गेलेल्या निश्चयी श्री. शंकरांना देखील ज्या पार्वती आदिमायेनें मोहून आपणाकडे ओढून आणलें ती पार्वती माता ज्या ठिकाणीं वास करीत आहे त्या पर्वतीनें तुम्हा सर्वांना आपल्याकडे ओढून घ्यावें यांत नवल तें काय बरें असेल ? ही पर्वती कांहीं भाविक स्त्रियांना व पुरुषांना देवभक्तीसाठीं आपल्याकडे ओढून घेते. अशा स्त्रिया व पुरुष मोठ्या पहाटेस उठून स्नान करून हातांत पूजापात्र घेऊन भाविक-पणें पर्वतीच्या दर्शनास जातात. त्यांना सहज चांगल्या स्वच्छ हवेंत उत्तम व्यायाम घडतो. त्यांचीं मनें प्रसन्न होतात, त्यांचीं शरीरें कसदार, तेजस्वी व निरोगी होतात, त्यांचे रोग पळून जातात, त्यांचा स्थूलपणा, त्यांचा वात, त्यांची चरबी झडून जाते व त्यांच्या पुत्रप्राप्ती वगैरे संबंधीं इच्छा साहजिकपणेंच पूर्ण होतात. अशा तऱ्हेनें देवीचा प्रसाद दृष्टीस पडल्यावर या भाविक भक्तांची निष्ठा पर्वतीवर अधिकच बसते व ही भक्तमंडळी पर्वतीचे उपकार स्मरून आपला नवस फेडतात व पर्वतीस भाविकपणानें कांहींनाकांहीं अर्पण करतात. पर्वतीची संपत्ती वाढते वर

सोय झाली व यामुळें प्रत्यहीं त्या उदारस्थूल भाटिया लोकांना शेंकडों मुखांतून आशीर्वाद मिळत आहेत.

असो आतां पर्वतीच्या पूर्व इतिहासाकडे वळूं. पर्वती हें प्रसिद्ध रमणीय व हवाशीर ठिकाण शहर सपाटी पासून २६१ फूट उंच अशा टेंकडीवर आहे. हें ठिकाण आरंभीं कसें प्रसिद्ध झालें या विषयीं दोन दंतकथा आहेत.

**पहिली दंतकथा**—:श्रीमंत छत्रपती शाहूमहाराज म्हणजे मराठी राज्याचे संस्थापक श्रीशिवाजी महाराज यांचे नातु व संभाजी महाराजांचे ज्येष्ठ चिरंजीव यांनीं मरणसमयीं आपले प्रिय व कर्तबगार पेशवे बाळाजी बाजीराव उर्फ नानासाहेब यांना आपल्या जवळ बोलावलें व आज्ञा केली कीं हें मराठी राज्य मी तुमच्या हवालीं करतों. शिवाजी महाराजांच्या गादीचा व वंशजाचा आदरानें सन्मान ठेवून आपण दक्षतेनें मराठी राज्याचा प्रतिपाल व संवर्धन करावें. ती आज्ञा स्वामिभक्त नानासाहेब पेशवे यांनीं शिरसावंद्य करून शिवाजी महाराजांच्या पादुका घेऊन ते पुण्यास आले व त्यांनीं त्या पादुका पर्वतीच्या टेंकडीवर स्थापिल्या व त्यावर सुंदर मंदिर बांधलें. नित्यानियमानें सकाळीं नानासाहेब पेशवे शिवछत्रपतींच्या पादुकांचें पर्वतीवर जाऊन दर्शन घेत व त्या थोर अवतारी पुरुषाच्या पुण्याईच्या जोरावर कारभारास आरंभ करीत. हा परिपाठ पुढील पेशव्यांनीं अव्याहत चालू ठेवला होता. पण शेवटचे बाजीराव पडले फार शहाणे. त्यांनीं विचार केला कीं आपण ब्राह्मण, शिवाजीमहाराज मराठे. तेव्हां त्यांस आपण नमस्कार करणें योग्य नाहीं. असा पोक्त विचार करून त्यांनीं त्या पादुकांच्या जागीं शंकराच्या लिंगाची स्थापना केली. ‘ विनाशकाले विपरीत बुद्धिः ’ म्हणतात ती हीच. जोंपर्यंत थोर अवतारी पुरुष छत्रपति शिवाजी महाराज यांना पेशव्यांकडून मान मिळत होता, तोंपर्यंत मराठी राज्याची भरभराट होत होती. शेवटच्या बाजीरावांनीं मराठी राज्याचे संस्थापक शिवाजी महाराज यांचा वर लिहिल्याप्रमाणें अपमान केल्यावर मराठी राज्य कां बुडणार नाहीं? आणि हें

सोय झाली व यामळें प्रत्यहीं त्या उदारस्थूल भाटिया लोकांना शेंकडों मुखांतून आशीर्वाद मिळत आहेत.

असो आतां पर्वतीच्या पूर्व इतिहासाकडे वळूं. पर्वती हें प्रसिद्ध रमणीय व हवाशीर ठिकाण शहर सपाटी पासून २६१ फूट उंच अशा टेंकडीवर आहे. हें ठिकाण आरंभीं कसें प्रसिद्ध झालें या विषयीं दोन दंतकथा आहेत.

**पहिली दंतकथा**—:श्रीमंत छत्रपती शाहूमहाराज म्हणजे मराठी राज्याचे संस्थापक श्रीशिवाजी महाराज यांचे नातु व संभाजी महाराजांचे ज्येष्ठ चिरंजीव यांनीं मरणसमयीं आपले प्रिय व कर्तबगार पेशवे बाळाजी बाजीराव उर्फ नानासाहेब यांना आपल्या जवळ बोलावलें व आज्ञा केली कीं हें मराठी राज्य मी तुमच्या हवालीं करतों. शिवाजी महाराजांच्या गादीचा व वंशजाचा आदरानें सन्मान ठेवून आपण दक्षतेनें मराठी राज्याचा प्रतिपाल व संवर्धन करावें. ती आज्ञा स्वामिभक्त नानासाहेब पेशवे यांनीं शिरसावंद्य करून शिवाजी महाराजांच्या पादुका घेऊन ते पुण्यास आले व त्यांनीं त्या पादुका पर्वतीच्या टेंकडीवर स्थापिल्या व त्यावर सुंदर मंदिर बांधलें. नित्यनियमानें सकाळीं नानासाहेब पेशवे शिवछत्रपतींच्या पादुकांचें पर्वतीवर जाऊन दर्शन घेत व त्या थोर अवतारी पुरुषाच्या पुण्याईच्या जोरावर कारभारास आरंभ करीत. हा परिपाठ पुढील पेशव्यांनीं अव्याहत चालू ठेवला होता. पण शेवटचे बाजीराव पडले फार शहाणे. त्यांनीं विचार केला कीं आपण ब्राह्मण, शिवाजीमहाराज मराठे. तेव्हां त्यांस आपण नमस्कार करणें योग्य नाहीं. असा पोक्त विचार करून त्यांनीं त्या पादुकांच्या जागीं शंकराच्या लिंगाची स्थापना केली. 'विनाशकाले विपरीत बुद्धिः' म्हणतात ती हीच. जोंपर्यंत थोर अवतारी पुरुष छत्रपति शिवाजी महाराज यांना पेशव्यांकडून मान मिळत होता, तोंपर्यंत मराठी राज्याची भरभराट होत होती. शेवटच्या बाजीरावानीं मराठी राज्याचे संस्थापक शिवाजी महाराज यांचा वर लिहिल्याप्रमाणें अपमान केल्यावर मराठी राज्य कां बुडणार नाहीं? आणि तें

लवकरच बुडालेंशी. खरोखर पर्वती हें ठिकाण दरवर्षी शिवाजी महाराजांचा जन्मोत्सव करण्यास अगदीं योग्य आहे. कारण त्या ठिकाणीं शिवाजी महाराजांच्या पादुका श्रीमंत नानासाहेब पेशवे यांच्या हस्तें स्थापन झालेल्या होत्या.

**दुसरी दंतकथा:—** या टेंकडीवर फार प्राचीन काळापासून पर्वती या नांवाची देवी होती. पर्वती हें नांव बहुधा पार्वती या नांवाचा अपभ्रंश असावा. पहिल्यानें ती देवी फारशी प्रसिद्ध नव्हती. तिचे सर्व भक्त जंगली लोक होते. हिचा पुजारी रोज टेंकडीवर जाई, देवीची पूजा करी व परत येई, असा त्याचा नित्यक्रम चालला असतां, एक दिवस मोती बागेंतून श्रीमंत नानासाहेब पेशव्यांच्या बायकोनें त्याला पाहिलें. तेव्हां तूं कोण रोज इकडे कुठे जातोस असें तिनें त्या पुजाऱ्याला विचारलें. त्या पुजाऱ्यानें आपण रोज टेंकडीवर असलेल्या पर्वती देवीची पूजा करण्यास जातों व ती देवी नवसांस हटकून पावते वगैरे हकीगत सांगितली. श्रीमंत नानासाहेब पेशवे यांच्या मातुश्री काशीबाई यांस इसबाची व्यथा होती. तेव्हां तिनें ती व्यथा दूर होण्यासाठीं पर्वती देवीस नवस केला. देवी नवसास पावली, पेशव्यांच्या आईच्या पायाचा इसब बरा झाला. मग काय विचारतां पेशव्यांची व त्यांच्या मातुश्रीची पर्वती देवीवर फार श्रद्धा बसली व पेशव्यांच्या हुकुमानें त्या देवीचें सुंदर देऊळ बांधण्यांत आलें. हें बांधण्याचें काम इ० स० १७४८ पासून इ० स० १७५५ पर्यंत चाललें होतें. देऊळ बांधण्यास सुमारें दहा लक्ष रुपये खर्च लागला. नैवेद्य वगैरे खर्चाकरितां पेशव्यांनीं या देवीस चांगली नेमणूक करून दिली. या देवीच्या दर्शनास खुद्द पेशवे दर एकादशीस जात असत, व स्वतः देवीची पूजा करीत. पर्वतीच्या देवळांत जी शिवाची मूर्ति आहे ती चांदीची असून तिचें वजन दोन मण आहे. शिवाचे एका मांडीवर पार्वती आहे. व दुसऱ्या मांडीवर गणपति आहे. पार्वती व गणपती यांच्या या मूर्ति सोन्याच्या आहेत. पार्वतीची मूर्ति ११०० तोळे वजनाची आहे व गणपतीची मूर्ति ९०० तोळे वजनाची आहे. देवांस जडावाचे व मोत्यांचे

बहुमोल दागिने पुष्कळ आहेत. पर्वतीचें नानासाहेब पेशवे यांनीं बांधलेलें देऊळ फारच सुरेख होतें, पण इ० स० १७९१ सालीं तें वीज पडून जळून गेलें. सुदैवानें मूर्तीस बिलकूल इजा पोंचली नाहीं.

इ० स० १७४९ सालीं श्रीमंत नानासाहेब पेशवे यांनीं मोठ्या धार्मिक विधीनें या टेंकडीवर देवदेवेश्वर, श्री महादेव, गणपती व पार्वती यांची प्राणप्रतिष्ठा ११ एप्रील रोजीं केली. यांपैकीं वर आलेंच आहे कीं महादेवाची मूर्ति चांदीची असून त्यांच्या मांडीवरच्या गणपती व पार्वती सोन्याच्या आहेत. श्रीमंत नानासाहेब पेशवे रोज पर्वतीवर घोड्यावरून फिरावयास जात व तेथील सुंदर सृष्टीदेवीचे देखावे पहाण्यांत तासचे-तास गुंग होऊन जात. इ० स० १७६० सालीं पर्वतीच्या देवळाचा कळस पेशव्यांनीं सोन्यानें मढविला. त्याला एकंदर १०२० तोळे सोनें लागलें. मुख्य देऊळ देवदेवेश्वराचें आहे. त्याच्या चार कोंपऱ्यांस सूर्य, गणेश, पार्वती अथवा अंबा व विष्णु यांचीं लहान देवळें आहेत. देवदेवेश्वरा समोर दगडाचा नंदी आहे. या देवळाच्या पश्चिमेस एक कार्तिक स्वामींचें देऊळ आहे व त्याच्याही पलीकडे श्री विष्णूचें स्वतंत्र देऊळ आहे. इ० स० १७५५ त श्री. नानासाहेब पेशवे यांनीं स्वतःसाठीं या टेंकडीवर एक वाडा बांधला. याच पर्वतीच्या देवळाजवळ सन १७६१ च्या मराठ्यांच्या भयंकर पराभवाचा धक्का बसून श्रीमंत नानासाहेब पेशवे १७६१ त मरण पावले. पर्वतीच्या १०८ पायऱ्या इतक्या रुंद आहेत कीं त्यांवरून हत्ती देखील जाऊं शकतो. हत्तीवरून किंवा पालखींतून पर्वतीला जाण्याची पेशव्यांची चाल होती. अगदीं अलीकडे म्हणजे इ० स० १८७७ सालीं, त्या वेळचे प्रिन्स ऑफ वेल्स म्हणजे सातवे एडवर्ड बादशहा हे हत्तीवर बसून पर्वतीला गेले होते. तेव्हां त्यांचा हत्ती घसरला पण सुदैवानें बादशहांना इजा झाली नाहीं. पर्वतीवरून सर्व दिशांना पांहतां येतें व दूर दूरचे सुंदर देखावे पाहून मन अगदीं रमून जातें.

**रमणा:**—पर्वतीच्या पायथ्याशीं श्रीमंत नानासाहेब पेशवे यांनीं एक उंच भिंतीचें आवार तयार केलें होतें. या आवारांत श्रावण महिन्यांत

महाराष्ट्र, कर्नाटक, गुजराथ वऱ्हाड व उत्तर हिंदुस्तान या प्रांतांतून आलेल्या विद्वान ब्राह्मणांना त्यांच्या विद्वत्तेच्या मानानें हजार रुपयांपासून पांच रुपयेपर्यंत दक्षिणा वांटीत असत हीं चाल मुळ दाभाडे या सरदारांनीं सुरू केली, ती पेशव्यांनीं अखेरपर्यंत चालविली होती. या आवारांत ब्राह्मणांना कोंडून चार दरवाज्यांवर चार थोर गृहस्थांनीं बसून ब्राह्मणांना योग्यतेप्रमाणें दक्षिणा द्यावी असा क्रम असे. दक्षिणेची रक्कम इ० स० १७३७ त ४९ हजार रुपये होती ती वाढत वाढत इ० स० १७८९ सालीं २२५३५४ रुपयांपर्यंत गेली होती. मध्यंतरीं सन १७५२ सालीं तर ६२८३५२ रुपये दक्षिणा वांटली, पण १७६१ सालच्या भयंकर पानपतच्या युद्धाच्या दुसऱ्यावर्षीं म्हणजे इ० स० १७६२ त ही रक्कम फक्त ११८९८ च झाली. या दक्षिणेमुळें सर्व हिंदुस्तानचे विद्वान पंडीत पुण्यास [illegible] विद्येचें माहेरघर अशी पुण्याची सर्वत्र ख्याती झाली. [illegible] वैदिक, वैयाकरणी, ज्योतिषी, कवी, वेदांती, तत्वज्ञानी, भिषग्वर्य वगैरे सर्व प्रकारचे लोक असत. यांची परीक्षा रामशास्त्री प्रभुणे बाळशास्त्री, अय्याशास्त्री, व काशिनाथशास्त्री हे घेत व मग ज्याच्या माणसाच्या विद्वत्तेप्रमाणें त्याला योग्य दक्षिणा मिळे. त्यांतील अतिशय विद्वान असत त्यांची संभावना वाड्यांत होत असे व इतरांची या पर्वतीच्या पायथ्या जवळच्या रमण्यांत होत असे. शेवटच्या पळपुट्या व भोजन बहादूर बाजीरावांच्या कारकीर्दींतही दक्षिणेची रक्कम आठदहा लाखांपर्यंत गेली होती. परंतु या रायबाजींच्या वेळीं सरसकट सारखीच दक्षिणा परीक्षेशिवायच बहुतकरून देण्यांत येई. सन १८१८ त पेशवाई बुडाली व इंग्रज सरकारनें ही दक्षिणा बंद केली. या दक्षिणेची रक्कम इंग्रज सरकारनें एक पाठशाळा काढून त्या शाळेकडे लावून दिली, व या दक्षिणेंतून स्कॉलरशिपही ठेवल्या. याच हल्लींच्या निरनिराळ्या कॉलेजांतल्या फेलोशिप्स बनल्या व यांतून शिवाय दक्षिणा फंड निर्माण झाला.

# शिंद्यांची छत्री.

पुण्यांपासून तीन मैलावर एक खेडें आहे. त्याचें नांव वानवडी. या वानवडी जवळ वहिरोबाच्या ओढ्याच्या डाव्या बाजूस ही शिंद्यांची छत्री म्हणजे महादजी शिंदे यांची समाधी आहे. हे महादजी शिंदे अत्यंत पराक्रमी व मुत्सद्दी पुरुष होऊन गेले. त्यांनी आपले पराक्रमानें प्रत्यक्ष दिल्लीचा बादशहा आपला अंकित केला व अशा तऱ्हेनें सर्व हिंदुस्तान मराठ्यांच्या सत्तेखालीं आणलें. असें हें नररत्न अत्यंत दिग्विजय गाजवून आपलें सर्व वैभव श्रीमंत सवाई माधवराव यांस अर्पण करण्यांसाठीं पुण्यास आले होते व वानवडीस राहिले होते. त्यावेळीं पुण्यास एवढा मोठा थाटाचा समारंभ झाला कीं अजूनहीं त्याविषयीं लोक मोठ्या अभिमानानें बोलतात. परंतु मराठी राज्याचे ग्रह फिरले होते म्हणून हें नररत्न आह्मां मराठ्यांस फार दिवस लाभलें नाहीं. ता. १२ फेब्रुवारी इ० स० १७९४ सालीं नवज्वराच्या दुखण्यानें पुण्या नजीकच्या वानवडी गांवीं या नरवीराचा अंत झाला. या ठिकाणी श्रीमंत अलिजाबहाद्दर शिंदे सरकार यांनी एक सुंदर छत्री बांधली आहे. या ठिकाणीं दौलतराव शिंदे म्हणजे श्रीमंत महादजी शिंदे यांचे चिरंजीव यांनीं छत्री बांधण्यास सुरवात इ० स० १७९५ च्या आगस्ट महिन्यांत केली. पण पुढें तें काम अर्धवटच राहिलें होतें. त्या छत्री जवळ एक लहानसें खेडें वसलें तेथें एक मारुतीचें व एक महादेवाचें देऊळ बांधलें. दौलतरावांच्या हातून अपुरें राहिलेलें छत्रीचें काम मध्यंतरीं श्रीमंत महाराज जनकोजी सिंदे म्हणजे महादजींचे नातु यांनीं इ० स० १८२० त हातीं घेतलें, परंतु तें त्यांच्याहातून पुरें होण्यापूर्वींच कालानें इ० स० १८४२ त त्यांस निर्दयपणें ओढून नेलें. अगदीं अलीकडे, ह्या छत्रीची दुर्दशा श्रीमंत अलिजाबहाद्दर माधवराव शिंदे

म्हणजे हल्लींचे ग्वालियार संस्थानचे कर्तबगार अधिपती यांच्या नजरेस पडली. लगेच त्यांनीं या कामासाठीं मोठी थोरली देणगी दिली, व पुणें शहराला अतीशय शोभा आणणारी टोलेजंग सुंदर व मजबूत छत्री म्हणजे समाधी बांधविली. ती पाहून हल्लींच्या शिंदेसरकारची आपल्या थोर पूर्वजांविषयींची भक्ति व औदार्य प्रेक्षकाच्या चटकन मनांत येतें व तो अगदीं आश्चर्य चकित होतो. पुण्यांतील प्रत्येक मनुष्यानें व पुणें पहाण्यास येणाऱ्या प्रवाश्यांनीं ही छत्री अवश्य पहावी. असें रमणीय स्थान फारच क्वचित पहावयास मिळतें. या ठिकाणी रणधुरंधर महादजी शिंदे यांचा पुतळा असून महादजी जिवंत असतां झाफेनी नांवाच्या नामांकित चितान्यानें काढलेल्या महादजी शिंदे यांच्या उत्कृष्ट तसबिरीचा फोटोही ठेवला आहे. ही मूळ तसबीर हल्लीं आलिजा बहादूर शिंदे सरकारनें ग्वाल्हेर शहरीं ठेवली आहे. ह्या छत्रीचें कितीही वर्णन केलें तरी तिच्या सौंदर्याची व भव्यतेची कल्पना पाहिल्या शिवाय क्वचितच येणार. तेव्हां तिचें वर्णन करण्याच्या भरीस न पडतां पुनः एकदां प्रत्येकानें ती अवश्य पहावी असें सांगून लेखणी खालीं ठेवतों.

---

# शेवटचे दोन शब्द.

वाचकहो झालें. अत्यंत प्रेमाचें, अत्यंत आनंदजनक असें पुण्यग्रामाच्या वर्णनाचें काम पुरें झालें. पुरें झालें असें म्हणतों पण पुरें झालें असें मन कांहीं सांगत नाहीं. पुण्याविषयीं जितकें लिहावें तेवढें थोडेंच. तेव्हां कितीही लिहिलें तरी समाधान थोडेंच होणार. शिवाय हें पुणें, ह्या महाराष्ट्राचा पुण्यग्राम, ही शिवरायांची बाळलीलांची पुण्यनगरी, हें शिवरायांच्या स्वराज्याचें पुण्यक्षेत्र असें आहे कीं त्याच्या विषयींचें वर्णन नेहमी अपुरेंच रहाणार. या पुण्यग्रामांत इतक्या विभूति होऊन गेल्या आहेत, त्यांनीं निर्माण केलेल्या इतक्या निरनिराळ्या संस्था आहेत कीं सांगतां सोय नाहीं. तथापि यथा शक्ति सप्रेम भक्तिपूर्वक हे या थोर पुण्यग्रामाचें हें अल्प वर्णन लिहित असतां लेखकाचें मन जसें रमून गेलें, तसेंच हें वाचीत असतां वाचकांचेंही मन रमून जाईल, त्यांची महाराष्ट्राच्या पुण्यग्रामा विषयींची आदरबुद्धि जागृत होईल व त्यांचे डोळे महाराष्ट्राच्या या पुण्यग्रामाच्या आसपास फिरतील व पुण्यग्रामाच्या आसपासचा देवभक्तींनें व देशभक्तींनें संचरलेला प्रदेश पहाण्याची त्यांना उत्कट इच्छा होईल हें खास. म्हणूनच सध्या पुरती देशभक्त वाचकांची रजा घेण्यापूर्वीं त्यांना पुढें होणाऱ्या वरील इच्छेच्या तृप्ति करणार्थ ‘ पुण्यग्रामाच्या आसपास ’ हें पुस्तक लवकरच अर्पण करीन असें वचन देऊन मगच लेखणी खालीं ठेवावी हें बरें. तेव्हां तसें वचन देऊन व या वर्णनाच्या वाचनानें वाचकांचा उत्साह, देशभक्ति व आत्मविश्वास वृद्धिंगत होवो अशी जगदीशाची प्रार्थना करून हें वर्णन पुरें करतों.